प्रकाशक
रा. ज. देशमुख,
देशमुख आणि कंपनी,
७३९ बुधवार, पुणें २



चित्र
दीनानाथ दलाल

किंमत तीन रुपये

मुद्रक
मा. ह. पटवर्धन,
संगम प्रेस प्रा. लि.,
३८३ नारायण, पुणें २



ता. १६ मे १९५५

## *चलो हाँगकाँग !*

पूर्वेकडे जायला 'कॉर्फ्यू' बोट दुपारीं बारा वाजतां मुंबईहून सुटावयाची होती; तेव्हां सकाळी दहाच्या सुमारास बॅलार्ड पिअरवर येऊन पोहोंचलों. वैद्यकीय तपासणी, कस्टमची पहाणी वगैरे साडेदहापर्यंत संपवून नंतर उतारूंना आंत बोटीवर सोडणार होते. जाऊन येऊन या बोटीवर बत्तीस दिवस मला काढावयाचे होते. 'कॉर्फ्यु' हेंच बत्तीस दिवस माझे घर होणार होतें. या घरात कोण सोबती भेटणार, कुणाबरोबर हे दिवस काढावे लागणार, ही विवंचना मनाला हळूच कुरतडीत होती. पोहोंचवायला आलेल्या मित्रांबरोबर बॅलार्ड पिअरच्या वरच्या मजल्यावर चहा प्यायला गेलों तो तिथे 'आशा प्रॉडक्ट्स' चे श्री. वाखणकर भेटले. श्री. वाखणकरांचा व माझा बराच जुना परिचय होता. 'इकडं कुठं ?' म्हणून त्यांना विचारतां, नागपूरचे प्रख्यात वकील श्री. बोबडे यांना पोहोंचवायला ते आल्याचें कळलें. श्री. बोबडे व त्यांचे मित्र श्री. चांदूरकर हेहि माझ्यासारखेच पूर्वेच्या प्रवासाला निघाले होते, आणि माझ्याप्रमाणें याच बोटीनें परत येणार होते. वाखणकरांनी त्या दोघांची ओळख करून दिली तेव्हां मला अतिशय आनंद झाला. मनावरचें एक ओझें उचलल्यासारखे झाले. मराठी बोलणारीं एक सोडून दोन माणसें बरोबर आहेत, हें पाहून मन मोकळे झालें. भाषेची आपुलकी ही कांहीं एक विलक्षण गोष्ट आहे यांत शंका नाही.

बारा वाजतां बोटीनें धक्का सोडला आणि मुंबई बंदर हळूहळू अस्पष्ट

होऊं लागलें. बोबडे व चांदूरकर या दोघांना एक केबिन होतें. माझेहि केबिन दोन माणसांचेंच होतें. आपला जोडीदार कोण आहे तें पाहण्याकरितां खालीं केबिनमध्यें गेलों. सिंगापूरला जाणारा एक वयस्क सिंधी गृहस्थ माझ्या वरच्या बर्थवर होता. माझें सामान केबिनमध्यें लावून वरच्या डेकवर आलों, आणि बोबडे-चांदूरकर बसले होते तेथें डेकचेअर ओढून त्यांच्याबरोबर बोलत बसलों. एक योगायोग सांगण्यासारखा आहे. बोटीवर वाचण्याकरिता पूर्वेकडल्या प्रदेशांसंबधींची बरीचशी इंग्रजी पुस्तकें मी बरोबर घेतलीच होती, पण त्यांबरोबर लोकमान्य टिळकांचें 'गीतारहस्य' हि शांतपणें बोटीवर वाचण्याकरितां घेतलें होतें 'तुम्ही कोणतीं पुस्तकें आणली आहेत?' म्हणून बोबडे-चादूरकरांना विचारतां त्यांनीहि 'गीतारहस्य' आणल्याचें सांगितलें! त्याशिवाय 'ज्ञानेश्वरी', 'कुराणाचे इंग्रजी भाषांतर' आणि 'बायबल' हि त्यांनी आणलें होतें!

बोटीवर चढल्याबरोबर पहिली गोष्ट करावयाची म्हणजे जेवणघरांत आपलें टेबल ठरवून टाकावयाचें. नंतर प्रवास संपेपर्यंत त्याच टेबलावर आपल्या ठरलेल्या खुर्चीवर बसून तिन्ही वेळची जेवणें घ्यावयाची असतात. एका निवान्त कोपऱ्यांत खिडकीजवळ असलेलें चार माणसांचें टेबल होतें. आपण तिघांनी तें टेबल ठरवून टाकावे असा विचार करून आम्ही जेवणघराच्या मुख्य स्टचुअर्डकडे गेलों. यापूर्वी इटालियन आणि फ्रेंच बोटींनी मी प्रवास केला होता. त्या स्वातंत्र्यपूर्व काळांत ब्रिटिश बोटींनीं प्रवास करूं नये असें वाटत होते तें ठीकच होतें. आतां तसें कांहीं वाटत नव्हतें; आणि 'कॉर्फ्यू' वरल्या आमच्या बरोबरच्या ब्रिटिश स्त्री-पुरुषांची वागणूकहि ब्रिटिश स्वभावाच्या मर्यादेत चांगलीच मोकळेपणाची होती. पण हा म्हातारा स्टचुअर्ड थोडी जुन्या काळाची आठवण करून देणारा निघाला. त्याच्याकडे जाऊन 'अमुक टेबल आम्हांला तू देऊं शकतोस का?' असें आम्हीं त्याला विचारलें, तेव्हा आपल्या तासलेल्या भोपळ्यासारख्या चेहऱ्यावर शिष्टपणाचा आव आणून आणि कावळ्यासारखा एक डोळा वर करून 'कुठलं टेबल कुणाला द्यायचं तें माझ्या मर्जीवर आहे!' असें तो हंसत हंसत म्हणाला. 'तुझी ती मर्जी हें टेबल आम्हांला देण्याकरितां वापर!' असें चांदूरकर म्हणाले, तेव्हां तो थोडा नरमला, आणि 'बरं बरं' म्हणून 'तें' टेबल त्यानें आम्हांला दिलें.

## *सूर्यापेक्षां वाळू तापदायक*

सूर्याच्या उष्णतेचा त्रास होत नाही इतका त्याच्या उष्णतेनें तापलेल्या वाळूचा होतो, या न्यायानें या साहेबापेक्षांहि बोटीवरल्या 'गांवठी साहेबां'चा आम्हांला अधिक त्रास झाला. इटालियन किंवा फ्रेंच बोटीवरले गोरे वेटर किंवा या बोटीवरलेहि गोरे वेटर बहुतेक हंसतमुख आणि आदबशीर होते. दुपारच्या चहाच्या वेळी कोणत्याहि टेबलावर बसतां येत असे. त्या वेळीं आलेल्या गोऱ्या वेटरांचा अनुभव चांगला होता. पी. अँड ओ. च्या बोटीवर गोऱ्या वेटरांबरोबर गोव्याचे गांवठी साहेबहि असतात. यांतला एक साहेब आमच्या कायमच्या टेबलावर आमच्या वाट्याला आला होता. हा म्हातारा जितका नालायक तितकाच तिरसट आणि तुसडा होता. सांगितलेलें नीट ऐकायचें नाही, ऐकलेलें नीट करायचें नाही आणि एकदम तिरसटपणें उलट उत्तर द्यायचें, हे त्याचे विशेष पहिल्याच दिवशी आमच्या ध्यानांत आले. 'मेन्यू कार्ड' वर प्रत्येक 'कोर्स' चे हा नाही तर तो, नाही तर तिसरा असे दोनचार पदार्थ असतात. फ्रेंच किंवा विचित्र इंग्रजी नांवें असल्यामुळें एखाद्या वेळीं गोमांसाचा कुठला पदार्थ, इतर मांसाचा कुठला हें समजत नाही. वेटरचें इंग्रजी किंवा फ्रेंच आमच्यापेक्षां चांगलें असेल या समजुतीनें नव्हे, तर रोजच्या संवयीनें त्याला माहीत असायला हवें म्हणून हें घ्यावें की तें घ्यावें म्हणून कार्डावर बोट ठेवून मी त्याला विचारीत होतों. माझा प्रश्न पुरा व्हायच्या आतच 'तुम्ही सर्व काही घेऊं शकता!' असे आपल्या कोकणी हिंदीत त्यानें मला सांगितलें. मी एकदम थांबलों आणि त्याच्याकडे पाहूं लागलों. 'काय आणू?' म्हणून त्याने विचारलें, तेव्हां 'सर्व कांही आण!' म्हणून त्याला मी सांगितलें. तो माझ्याकडे पाहूं लागला. 'पाहूं नकोस, सर्व कांही आण!' असें मी त्याला बजावलें. त्याला चांगला दम भरल्यापासून माझ्याशीं किंचित् नम्रपणें तो वागू लागला.

सत्तरीच्या जवळ आलेल्या बोबड्यांसारख्या वयोवृद्ध गृहस्थाशीं तो फारच उद्धटपणें वागूं लागला, तेव्हां मुख्य स्टचुअर्डला सांगून आम्हीं त्याला चांगलें सरळ केलें. गोऱ्या उतारूंचे आपण नोकर; इतर हिंदी, चिनी वगैरे उतारूंचे आपण नोकर नाही, अशी कांहीं तरी समजूत बऱ्याच गांवठी साहेबांची झालेली

होती. गौरेतर उतारूंच्या या गांवठी साहेबांबद्दल दररोज कांहीं तरी तक्रारी होत. एकदां आमचा वेटर खुशींत येऊन मला सांगूं लागला, 'साहेबलोकांनाहि मेन्यू कार्डवरील फ्रेंच नांवं केव्हां केव्हां कळत नाहींत.' मीं त्याला म्हटलें, 'साहेबलोकांनाहि' या तुझ्या शब्दाचा अर्थ काय? ते साहेब आहेत म्हणून आमच्यापेक्षां अधिक शिकलेले आणि कुणीतरी मोठे आहेत असं तुला वाटतं कीं काय? त्यांच्यांत कुणी कापडविक्ये असतील तर कुणी एखाद्या कचेरींतले कारकून असतील. आपल्या टेबलावरले हे बोबडेसाहेब नि चांदूरकरसाहेब कोण आहेत याची तुला कल्पना आहे काय? हे बोबडेसाहेब नागपूर हाय-कोर्टाचे जज्ज होते, आणि हे चांदूरकरसाहेब दिल्लीच्या सुप्रीम कोर्टांत प्रॅक्टिस करणारे विद्वान् वकील आहेत!'

## *मलायांतील बंडाळी*

माझी खोली साफसूफ ठेवणारा स्टच्युअर्ड डायस हाहि गोवेकर ख्रिस्तीच होता. पण त्याचें काम जितकें चोख तितकाच त्याचा स्वभावहि चांगला होता.

दुपारीं जेवणानंतर डेकवर फिरत असतां हरकचंद नांवाच्या एका सिंधी गृहस्थाची ओळख झाली. तो पिनांगला चालला होता. गेलीं सात-आठ वर्षें मलायाच्या जंगलांतून कित्येक हजार कम्युनिस्ट बंडखोरांनीं ब्रिटिश राज्य-कर्त्यांशीं गनिमी काव्याचें युद्ध चालविलें आहे, आणि युरोपियन मळेवाल्यांचे खून पाडणें, जाळपोळ करणें वगैरे प्रकार मलायांत सतत चालू आहेत. वर्त-मानपत्रांतून यासंबंधीच्या बातम्या नेहमीं येत असल्यामुळें हरकचंदाला त्यासंबंधीं मीं विचारलें. व्यापाराकरितां मलायांत कित्येक वर्षें तो राहिलेला होता. तो म्हणाला, 'अलीकडे ही बंडाळी बरीचशी कमी झालेली दिसते. ब्रिटिशांचें केवढें तरी मोठें लष्कर सध्यां मलायांत आहे; आणि पूर्वींसुद्धां जंगलांतल्या दूरदूरच्या गांवांना आणि मळेवाल्यांना कांहीं त्रास झाला असेल, पण पिनांग, सिंगापूर, इपो, कुआला लंपूर वगैरे शहरांत किंवा शहरांच्या आसपास असलेल्या आम्हां लोकांना या बंडाळीची फारशी माहितीहि नाहीं नि उपद्रवहि झालेला नाहीं.'

रात्रीं अकराच्या सुमारास केबिनमध्यें झोंपायला गेलों तों माझा जोडीदार सिंधी व्यापारी आधींच आपल्या बर्थवर येऊन झोंपलेला दिसला. त्याच्या

भव्य पोटाचा भाग वरखालीं होत होता, आणि एका नाकपुडींतून वाघ आणि दुसरींतून सिंह घोरत आहेत की काय असा भास उत्पन्न करणारें त्याचें घनघोर घोरणें चालू होतें! तें घोरणें कानांवर पडल्याबरोबर माझ्या काळजाचा थरकांप झाला; आणि मॅक्बेथच्या सुरांत, 'झोंप? —आतां कसची यापुढें झोंप!' असें स्वगत पुटपुटत मीं शेळीसारखी उशीवर मान टाकली.

ता. १७ मे १९५५

## *असं थुंकणं बरं नव्हे!*

प्रातरुपाहार घेऊन आज सकाळीं डेकवर फिरत असतां कांचेच्या चौकटींत बसवलेला एक मोठा नकाशा एका बाजूला लावलेला दिसला. या नकाशांत मुंबई ते हाँगकाँग सर्व प्रदेश आणि बोटींचा मार्ग दाखविलेला होता. सकाळीं आठ ते दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठपर्यंत दर चार तासांला बोट कुठें असेल तें या नकाशावर लाल, निळ्या, पिंवळ्या, हिरव्या डोक्यांच्या पिना ठिकठिकाणीं लावून आणि त्याच रंगाच्या पिना बाजूला एके ठिकाणीं सकाळचे आठ, दुपारचे बारा, दुपारचे चार, रात्रीचे आठ अशा रीतीनें वेळा दाखविणाऱ्या कागदावर टोंचून दाखविलें होतें. पश्चिम किनाऱ्यानें खालीं कोलंबोकडे आमची बोट चालली आहे. आतां सकाळचे पावणेअकरा वाजले आहेत. सोसाट्याचा वारा वाहत आहे आणि जोराचा पाऊस पडत आहे. नकाशावरून साडेअकराच्या सुमारास मंगळूर बंदरासमोरून आम्ही जाणार. किनाऱ्यापासून बोट खूपच दूर आहे. कोंकणच्या बोटींतून दिसतो तितकाहि स्पष्ट किनारा दिसत नाहीं. पण दूर, खूप दूर निळसर डोंगरांच्या रांगा दिसत आहेत.

डेकवर आम्ही बसलों होतों तिथेंच शेजारच्या आरामखुर्चीवर एक सिंधी गृहस्थ बसला होता. दर पांच मिनिटांनीं तो पचक् करून कटड्याकडे थुंकायचा. चांदूरकरांच्यानें राहावेना. तो उलटून कांहीं तरी उत्तर देईल याची पर्वा न करतां ते त्याच्याकडे जाऊन म्हणाले, 'हें पाहा, असं थुंकणं बरं नव्हे. एका स्वतंत्र देशाचे आपण नागरिक आहोंत. अशा वागण्यानं या गोऱ्या लोकांसमोर आपल्या देशाची बेअब्रू होते!' सुदैवानें त्यानें निमूटपणें त्यांचें म्हणणें ऐकून घेतलें, आणि तो थुंकायचें थांबला.

अंडीं, मासे, पाव, लोणी, जाम, कॉफी वगैरेची भरपूर न्याहारी होऊन

अजून दोन तास झाले नव्हते. आतां सकाळीं दहाच्या सुमारास डेकवरच हवें त्याला कागदी कपांतून आइस्क्रीम खायला देण्यांत येत होतें. दुपारच्या जेवणाला दोन अडीच तासच होते, तरीहि कांहीं ब्रिटिश स्त्री-पुरुष आपल्या केबिनमधून स्वत:चे बिस्किटांचे डबे आणून बिस्किटें खात बसलेले पाहून आम्हांला आश्चर्य वाटलें. ब्रिटिशांचा खादाडपणा इतर युरोपियन लोकांच्या थट्टेचा विषय कां झाला आहे त्याचें इथें प्रत्यंतर आलें.

सिंधी लोक व्यापाराकरितां जगाच्या पाठीवर कुठें जाऊन राहिले आहेत त्याची या बोटीवर येईपर्यंत मला कल्पना नव्हती. डेकवर आज एक वृद्ध सिंधी गृहस्थ भेटला. स्पेनमध्यें जिब्रॉल्टर आणि उत्तर आफ्रिकेंत टँजिअर येथें त्याचा व्यापार आहे. मुंबईहून जिब्रॉल्टरला जाणाऱ्या कोणत्याहि बोटीवर जागा मिळेना म्हणून खालीं कोलंबोला जाऊन तो जिब्रॉल्टरची बोट घेणार आहे. कोलंबोहून फ्रेंच, डच, ब्रिटिश वगैरे नाना राष्ट्रांच्या बोटी युरोपला जातात. त्याच्याकडून कळलें कीं, जमेका, फिलिपाईन्स, बोर्निओ वगैरे अनेक ठिकाणीं सिंधी लोक व्यापाराकरितां गेले आहेत.

आज सारा दिवस पावसाळी हवा आहे. जूनच्या पहिल्या आठवड्यांत मुंबईंत पाऊस सुरू होतो. त्याआधीं पंधरा दिवस कोलंबो येथें मान्सून येतो असें म्हणतात. तेव्हां कोलंबोला पावसाळा सुरू झालेला असावा. उद्यां समजेलच. आज सूर्याचें दर्शन नाहीं.

आमच्या ‘ कॉर्फ्यू ’ च्या जोडीची पी. अँड ओ. ची ‘ कॉर्थेज ’ बोट मुंबईकडे चालली आहे ती संध्याकाळीं पावणेसहाला आमच्या बाजूनें जाईल, असें दुपारच्या चहानंतर ध्वनिक्षेपकावरून सांगण्यांत आलें. दुसरी बोट दिसणार हा बोटीवरल्या जीवनांत एक मोठाच प्रसंग ! आम्ही उतारू मोठ्या उत्सुकतेनें ‘ कॉर्थेज ’ ची वाट पाहात होतों. शेवटीं एकदांची पावणेसहाला ती दिसली, आणि आम्ही स्वस्थ झालों. जमिनीवरल्या मोठ्या जगांतून या तरंगत्या चिमुकल्या जगांत येऊन पडल्यामुळें कांहीं लहानसान गोष्टी एकदम मोठ्या वाटूं लागतात. कुठें जमीन दिसली कीं चांगलीं प्रौढ माणसें मुलांसारखीं हुरळून जातात.

रात्रीं जेवणानंतर ‘ कॅरिंग्टन, व्ही. सी. ’ हा नांवाजलेला ब्रिटिश बोलपट डेकवर दाखवण्यांत आला.

ता. १८ मे १९५५

## *कोलंबो बंदरांत*

रात्रभर बाहेर समुद्रावर घोंघावणाऱ्या वाऱ्यांचे 'हूं, हूं' असे आवाज केबिनमध्यें ऐकूं येत होते. नकाशांत वाचलें होतें कीं, सकाळीं आठाच्या सुमारास आम्ही कन्याकुमारीसमोर असू. दक्षिण भारताच्या प्रवासांत कन्याकुमारीच्या टोंकाला रात्रीच्या मिट्ट काळोखांत आम्ही तिथें असतां तीन महासागरांवरून येणारे वारे समोरच्या काळोखांत असेच घोंघावत होते; आणि सारा भारतवर्ष आपल्या मागें उभा आहे या मनांत हेलावणाऱ्या भावनेनें स्वतःला धीर देत भयचकित नजरेनें आम्ही समोर पाहात होतों.

दुपारीं १२ ला मानारच्या आखातांत आणि ४ वाजतां कोलंबो असें नकाशांत होतें; पण चहाच्या वेळीं ध्वनिक्षेपकांनीं सांगितलें की बोट संध्याकाळीं साडेसहाच्या सुमारास कोलंबो बंदरांत शिरेल. इथें बोट धक्क्याला लागत नाहीं. धक्क्यापर्यंत वाफोरांतून किंवा लाँचेसमधून उतारूंची ने-आण होते. उतरणाऱ्या उतारूंना वाफोराचें तिकिट घ्यावें लागत नाहीं. पण कोलंबोंत फिरून परत बोटीवर येणाऱ्यांना तीन शिलिंगांचें तिकिट बोटीवरच मिळतें तें घ्यावें लागतें. आम्ही तिकिटें घेऊन पांच वाजतां कपडे करून तयार राहिलों होतों. साडेपांचच्या सुमारास दूर अंतरावर नारळीच्या दाट बनांनीं भरलेला सिलोनचा किनारा दिसूं लागला. समुद्र अतिशय खवळलेला होता, आणि ढगाळ आकाशांतून सारखा पाऊस पडत होता. साडेसहाला बोट कोलंबो बंदरांत शिरणार आणि रात्रीं बाराला सुटणार तेव्हां या पावसांत कोलंबोंत जाऊन तरी करायचें काय असा विचार आम्ही करीत होतों.

सहाला कोलंबो बंदर स्वच्छ दिसूं लागलें. हिरवेगार डोंगर, त्यांच्यावरील लाल छपरांचीं घरें, बोटी सुरक्षित उभ्या रहाव्या म्हणून समुद्रांत बांधलेले लांबच लांब बांध, त्यांवरील पांढरीं दीपगृहें भराभर जवळ येऊं लागलीं. फ्रेंच, इटालियन, जर्मन, नानादेशांच्या मोठमोठ्या बोटी बंदरांत उभ्या होत्या. आमची बोट उभी राहिली. पाऊस पडतच होता. आठ वाजतां जेवण घेऊन परत डेकवर आलों तेव्हां पाऊस थांबला होता. रात्र असली आणि फार वेळ नसला तरी धक्क्यावर जाऊन गांवांत फिरून तर यावें असा विचार

करून वाफोरांत बसलों आणि धक्क्यावर गेलों. कोलंबो एवढें मोठें आंतरराष्ट्रीय बंदर असून हा धक्का अगदींच एखाद्या वखारीसारखा सामान्य आहे; मात्र पायऱ्या चढून वर गेल्यावर बंदराची भव्य पांढरी इमारत दिसते, आणि सिलोन सरकारच्या माहितीखात्याचें सिलोनमध्यें होणाऱ्या हस्तिदंती वस्तू वगैरेंचें प्रदर्शन आणि प्रवाशांसाठीं रंगीबेरंगी पुस्तकें असलेलें दालन, सिलोनी चहाचें सरकारी दुकान, पैसे बदलण्याचा ब्यूरो वगैरे पाहून मोठ्या शहरांत आल्यासारखें वाटतें.

आमच्यासारखेच कोलंबोंत तास दोन तास भटकण्याकरतां पिनांगला जाणारा शहा आणि हाँगकाँगला जाणारे बोटीवरले दोन तीन सिंधी मुलगेहि आले होते. बोटीवर शाकाहारी अन्न चांगलेंसें मिळत नसल्यामुळें कोलंबोंतल्या एखाद्या दुकानांत भातआमटी किंवा पुरीभाजी खायला शहा उत्सुक झाला होता. थोड्या अंतरावर चालून गेल्यावर एका रस्त्यावर 'मद्रासी ब्राह्मणाचें हॉटेल', 'मलबार हॉटेल' वगैरे इंग्रजी पाट्या दिसल्या. शहा व ते सिंधी मुलगे मद्रासी हॉटेलांत शिरले. आम्ही तिघे पायीं भटकण्याकरतां पुढें निघालों. सिलोनमध्यें परक्या ठिकाणीं आल्यासारखें मुळींच वाटत नाहीं. एखाद्या मद्रासी शहरांत फिरत आहों, असें वाटतें. फिरत फिरत कोलंबोच्या फोर्ट रेल्वे स्टेशनाकडे आम्ही गेलों. स्टेशनांत शुकशुकाट होता. स्टेशनाच्या आवारांत कांहीं रिक्शावाले होते. तासाला फक्त एक रुपया द्या, आम्ही तुम्हांला सर्व शहर दाखवतों असें म्हणत ते आमच्या मागें लागले. आम्हांला रात्रीं अकरा वाजेपर्यंत बोटीवर परत जायचें होतें, तेव्हां बंदरापासून फार दूर भटकण्यांत अर्थ नव्हता.

मुंबईंतल्या कोट विभागासारख्याच कचेऱ्या, मोठमोठ्या इमारती, रुंद रस्ते वगैरे असलेला कोलंबोचा भाग बंदराच्या आसपासच आहे. पण रिक्शावाले आमची पाठ सोडीनात. एक काळा मद्रासी दिसणारा रिक्शावाला पुन्हा पुन्हा आम्हांला इंग्रजींत सांगत होता,'Sir, I am Indian. I won't cheat you !'

त्याच्या त्या भ्रातृभावाचा आमच्या मनावर कांहीं परिणाम होणें शक्य नव्हतें; कारण त्याच्या श्वासाश्वासाबरोबर दारूच्या घाणीचा भपकारा बाहेर पडत होता !

कांहीं मोठ्या रस्त्यांवर 'फ्री चायना हॉटेल', 'पेपिग हॉटेल' या नांवाचीं

चिनी उपाहारगृहें दिसलीं. एक चँग-कै-शेक पक्षीय चिन्यांचें असेल तर दुसरें कम्युनिस्टपक्षीय चिन्यांचें असावें! 'लंका महिला समिती' अशी पाटी एका दुकानावर दिसली. दुकान बंद होतें, पण कांचेच्या तावदानामागें लंकेच्या महिलांनीं बनविलेल्या चटईच्या पिशव्या, बायकांच्या मनीबॅग्ज, वगैरे हस्तव्यवसायांचे नमुने दिसत होते. गॉल फेसच्या समुद्रकिनाऱ्याच्या बाजूला गेलों; तिथें तुफानी वारा घोंघावत होता. सुदैवानें पाऊस मात्र थांबला होता. रात्रीचे साडेनऊ दहाच वाजले आहेत; पण कोलंबोच्या या चॅथॅम् स्ट्रीट, यॉर्क स्ट्रीट वगैरे मोठमोठ्या रस्त्यांवर माणसांचा शुकशुकाट दिसतो. मुंबईच्या मानानें कोलंबो फार लहान वाटतें.

## *बिंबप्रतिबिंबांचीं विचित्र दिवाळी*

माडेदहाला धक्क्याकडे परत आलों. बोटीवर पोहोंचविणारी लाँच तयारच होती. फ्रेंच, इटालियन वगैरे बोटींवर परत जाणारे इतर युरोपियन उतारूहि लाँचमध्यें बरेच होते. 'टोस्कानो' नांवाची एक जंगी इटालियन बोट आमच्या बोटीशेजारींच उभी होती. तिच्यावरले कोलंबो पाहून परतणारे बरेच इटालियन स्त्रीपुरुष लाँचमध्यें होते. नादमधुर आकारान्त आणि इकारान्त इटालियन शब्दांत बायकामुलांची आणि पुरुषांची मोठीच गडबड चालू होती. निळे-पिवळे शर्ट आणि लालहिरवे पायमोजे घातलेले ते बांधेसूद देखणे पुरुष आणि खांदे उडवून गोड चिवचिवणाऱ्या त्या रेखीव चेहऱ्यांच्या गुलाबी इटालियन बायका पाहतांना, बोटीवरले धीरगंभीर ब्रिटिश पुरुष आणि ओबडधोबड ब्रिटिश बायका पाहून कंटाळलेल्या माझ्या मनाला फार बरें वाटलें! बहुतेक इटालियनांच्या हातांत दोनतीन भलींमोठीं शहाळीं, एखादें दुसरें प्रचंड सिलोनी अननस किंवा केळ्यांचा लांबलचक घड होता. पूर्वेचा हा मेवा संभाळीत, एकमेकांची थट्टा करीत, हंसत खिदळत ही मंडळी चालली होती. 'टोस्काना' बोटीला लाँच लागली, आणि ते सर्व उतरले. त्यानंतर लाँच 'कॉर्फ्यू' कडे निघाली. पांढऱ्या, लाल, हिरव्या हजारों विजेच्या दिव्यांनीं लखलखणाऱ्या किती तरी लहान मोठ्या नौका पाण्यावर इतस्ततः डुलत होत्या आणि त्यांच्यावरल्या हजारों दिव्यांचीं हजारों प्रतिबिंबें काळोखानें माखलेल्या

समुद्राच्या पाण्यावर नाचत होतीं. बिंबप्रतिबिंबांची ही विचित्र दिवाळी पाहात आम्ही 'कॉर्फ्यू' वर उतरलों. रात्रीं साडेबाराला बोटीनें कोलंबो सोडलें.

ता. १९ मे १९५५

## *पाण्याचे हिमालय !*

प्रातरुपाहारानंतर सकाळीं डेकवर आलों तेव्हां लख्ख ऊन पडलेलें पाहून बरें वाटलें. आतां मलायाच्या दिशेनें सारखे चार दिवस आम्ही सरळ पूर्वेकडे जाणार. हा मान्सून वाऱ्यांचा प्रदेश नसल्यामुळें आतां फारसा पाऊस नसेल या आनंदांत होतों. पण संध्याकाळी सहाच्या सुमाराला आकाश आणि पाणी यांनीं महाभारतीय रणभूमीचें स्वरूप धारण केलेलें दिसलें. आकाश काळें-कभिन्न झालें होतें. समुद्राच्या अक्राळविक्राळ लाटा उठत होत्या. एवढी मोठी बोट इतक्या अगतिकपणें हालत होती कीं डेकवर पाय ठरेना. अफाट काळें आकाश, उफाळणारा अमर्याद समुद्र, दशदिशा भरून टाकणारा मुसळधार पाऊस आणि या विराट् पसाऱ्यांत मध्येंच डुबकणारी आमची इवलीशी बोट याशिवाय जगांत दुसरें कांहीं उरलेंच नाही कीं काय, असें आजूबाजूला पाहतां वाटूं लागलें. तुफान वादळाचें दृश्य अविस्मरणीय होतें. पाहावें तिथें निळ्या पाण्याचे हजारो हिमालय वर उठून उभे राहूं पाहात होते, आणि त्या सर्वांना पालाण घालूं पाहाणारें अफाट, क्रुद्ध, काळें आकाश सहस्र धारांनीं त्यांना झोडपून जणूं काय वर उठू नका म्हणून दरडावीत होतें ! रात्र पडू लागली तसा पाऊसवारा कमी होऊं लागला.

ता. २० मे १९५५

## *मॅड्‌हॅटर्स बॉल*

कालचें आकाश आणि कालचा समुद्र न पाहिलेल्या अशा एखाद्या माणसाला आज सकाळीं १० वाजतां बोटीच्या डेकवरून जर कुणी आकाश आणि समुद्र दाखवला असता आणि त्यांच्या कालच्या रौद्ररूपाचें वर्णन केलें असतें तर सांगणाराला त्यानें साफ खोटें बोलणारा ठरवलें असतें. कालचाच का हा

समद्र? प्रशान्त निळ्या पाण्यावर हंसऱ्या लहरी उठत आहेत, आणि त्यांना हलकेच बाजूला करीत बोट कशी सरसरसरसर पुढें चालली आहे.

आज रात्रीं डेकवर 'मॅड्हॅटर्स बॉल' आहे. नाचांत भाग घेणाऱ्या स्त्रीपुरुष उतारूंनीं अगदीं वेड्याविद्ऱ्या टोप्या डोक्यावर ठेवून यायचें. चत्मकारिक टोपी बनविण्यांत जास्तींत जास्त कल्पनाशक्ति दाखवणारांना तीन बक्षिसें देण्यांत येणार आहेत. उतारूंमधल्या दोघातिघांची परीक्षक-समिति आहे. भाग घेणारे आणि परीक्षक सर्वच युरोपियन आहेत. अर्थात् कुणाला कसलीच बंदी नाहीं. नाचणाऱ्यांत एखादा पारशी किंवा सिंधी तरुण दिसतो. खुर्च्या बाजूला काढून सबध डेक् मोकळें करण्यांत आलें आहे. सुरत-दमणच्या बाजूचे मुसलमान खारवे या बोटीवर शिड्या लावणारे, दोरखंड ओढणारे, डेक धुणारे खलाशी म्हणून काम करतात. त्यांच्यापैकीं दोघे संध्याकाळीं डेकवर पावडर टाकून तें नाचाकरतां गुळगुळीत करीत होते. डेकवरल्या आणि जेवण-घरांतल्या दिव्यांनाहि रंगीबेरंगी कागद आज लावलेले होते. आज रात्रीं जेवणघर किंवा डायनिंग सलून विशेष शृंगारलेलें होतें. जेवणाचा थाटहि विशेष होता. निरनिराळ्या मद्यांची नावें आणि किमती आजच्या खास रंगीत मेन्युकार्डमध्यें दिल्या होत्या.

जेवणानंतर रात्री ९ ला 'बॉल्' सुरू झाला. पहिलें बक्षीस मिळविणाऱ्या बाईनें रंगीत कागदाची ताटासारखी टोपी करून मध्यें कलतें 'कॉक्टेल' मद्याचें ग्लास ठेवलें होतें; तर पहिलें बक्षीस जिकणाऱ्या पुरुषानें अगदीं साधी पण कल्पनायुक्त टोपी केली होती. एका सफरचंदांत एक तीर आडवा घालून त्यानें तें हनुवटीखालून घेतलेल्या रेशमी फितीनें डोक्यावर बांधलें होतें. या हॅटचें नांव 'विल्यम् टेल्.' दोघां तरुणांनीं डोक्यावर कातड्याच्या बॅगा ठेवून हनुवटीला त्या पट्ट्यानें आंवळल्या होत्या आणि 'हमाल हॅट्' असें नांव दिलें होतें! एकानें सहा रिकाम्या बिअरच्या बाटल्यांची माळ करून ती डोक्याभोंवतीं गोल बांधली होती, आणि मध्यें अर्धा भरलेला बिअरचा ग्लास ठेवला होता. नांव दिलें होतें 'To-night in Town !' लंडन ते हाँगकाँग एक महिना बोटीवर काढायचा असतो, तेव्हां नानाप्रकारचे गंमतीचे कार्यक्रम युरोपियन उतारू शोधून काढतात. कसा तरी प्रवास करणें त्यांना पटणारच नाहीं. जीवन जगण्याकरतां आहे हा तर त्यांचा बाणा.

ता. २१ मे १९५५

## *मसाल्याचीं बेटें*

आकाश स्वच्छ निळें दिसत आहे. सोनेरी उन्हांत समुद्राचें पाणी इंद्रनील मण्यासारखें चमचमतें आहे. परवांचा समुद्र अक्राळविक्राळ राक्षस तर आजचा समुद्र राजबिंडा तरतरीत तरुण ! सकाळचे दहा वाजले आहेत. उजव्या हाताला एक हिरवेंगार चिमुकलें बेट दिसत आहे. पलीकडे दूर निळसर डोंगरांच्या रांगा दिसतात. दुपारीं बाराला सुमात्रा बेटाच्या टोकाजवळून आम्ही जाणार. अकराच्या सुमारास एक मोठ्या बेटाच्या इतक्या जवळून आम्ही जात आहोंत, कीं डोंगरावरली हिरवळ, डोंगरांतलीं लाल छपराचीं घरें आणि किनाऱ्या-वरलीं तुरळक पांढरीं घरें चांगलीं दिसत आहेत. दुपारी अडीचनंतर सुमात्राचे डोंगर दिसूं लागले. सुमात्रा, जावा हींच ती लहानपणीं इतिहास-भूगोलांत वाचलेलीं मसाल्याचीं बेटें ! लहानपणीं वाटे, या बेटांवर मसालाच मसाला जिकडेतिकडे असेल. प्रौढपणीं कळलें की मसाल्याचीं बेटें म्हणजे दालचिनी, लवंग वगैरे मसाल्याला लागणाऱ्या गोष्टी इथें खूप पिकतात म्हणून हीं मसाल्याचीं बेटें !

ता. २२ मे१९५५

## *मळायाचें धन-रबर !*

आज सकाळीं सात-साडेसातला बोट पिनांग बंदराला लागायची होती. सकाळीं सहाला जागा झालों, आणि केबिनच्या पोर्ट होलमधून बाहेर पाहिलं तेव्हां लाल मातीचे डोंगर, त्यांवर अधूनमधून लुकलुकणारे दिवे, पांढरीं घरें अशा प्रकारचें, विजयदुर्ग, जयगड वगैरे आपल्याकडल्या कोंकणच्या बंदरांत पहांटेच्या वेळीं बोट शिरतांना ज्या प्रकारचें दृश्य दिसतें तसेंच दृश्य दिसत होतें. बोट बंदरांत शिरतांना जे खड्खड् थड्थड् आवाज होतात ते होत होते. तोंड धुणें वगैरे आटोपून सात वाजतां डेकवर गेलों. बोट उभी राहिली होती, आणि शिड्या वगैरे लावावयाचें काम चालू होतें. बोट आंत शिरतांना कोंकणच्या बंदराची आठवण झाली, पण आतां धक्क्याला लागली होती तेव्हां धक्का चांगला लांबरुंद, मोठमोठ्या घरघर करणाऱ्या याऱ्या, पेट्यांचे ढीग, हमालांची धांवपळ वगैरे मुंबई बंदरासारखें दृश्य दिसत होतें.

मुंबईसारख्याच सकाळीं सात वाजतांच अंगांतून घामाच्या धारा निथळत होत्या. बंदराच्या पलीकडे मशिदीसारखा घुमट असलेला एक पांढऱ्या रंगाचा घड्याळाचा मनोरा दिसत होता. त्या घड्याळांत साडेसात वाजलेले होते. घड्याळ अर्धा तास पुढें करावयाला विसरल्यामुळें माझ्या घड्याळांत सात वाजले होते. घड्याळें अर्धा तास पुढें करण्याची बोटीवर रात्रींच सूचना देण्यांत आली होती.

धक्क्याला लागलेली बोटीची बाजू सोडून दुसऱ्या बाजूला जाऊन उभा राहिलों तों किती तरी मोठमोठ्या बोटी बंदरांत उभ्या असलेल्या दिसल्या. पलीकडे दूर मलायाच्या मुख्य भूमीचा किनारा दिसत होता. कारखान्यांचीं धुराडीं, कांही पांढऱ्या काळ्या इमारती अस्पष्ट दिसत होत्या. पिनांग हें मलायाचें एक मोठें बंदर आणि एक सुंदर बेट म्हणून प्रसिद्ध आहे. बोटीवर आलेल्या अधिकाऱ्यांनीं पासपोर्टची तपासणी केली, इतर कागदपत्र पाहूयले, आणि आम्ही पिनांग पाहण्याकरितां बाहेर पडावयाला मोकळे झालों. रात्रीं बारा वाजतां सिंगापूरला जाण्याकरितां बोट पिनांग सोडणार होती. बोटीवर प्रातरुपाहार घेतला आणि साडेआठच्या सुमाराला डेकवर जाऊन धक्क्याकडे पाहात, पुढे काय करावयाचें याचा विचार करूं लागलों. कोलंबोचे एक बॅरिस्टर सेल्वरत्नम् तिलक मुथु कोलंबोपासून आमच्याबरोबरच बोटीवर होते. पिनांग-मध्ये ते प्रॅक्टिस करतात. बायकोला आणि लहान मुलाला घेऊन कोलंबोहून ते पिनांगला परत आले होते. उतरण्याच्या तयारींत ते डेकवर उभे होते. 'काय हो, तुमच्या पिनांगमध्यें उतरायला हरकत नाही ना? मलायाच्या जंगलांत कम्युनिस्ट बंडखोर आहेत, आणि मधून मधून रबराच्या मळ्यावर किंवा कुणाच्या घरांवर छापे घालून ते दिसेल त्याला ठार करतात नि लूटमार करतात असं वर्तमानपत्रांत आम्ही वाचतों!' मी सेल्वरत्नम्ना थट्टेनें म्हणालों. 'छे हो,' ते हंसत म्हणाले, 'त्याची तुम्हांला काळजी नको. पहिली गोष्ट म्हणजे आमच्या पिनांगमध्यें कुठें कुणाचे छापे पडत नाहींत. मलायाच्या मुख्य भूमीवर खेड्यापाड्यांवर अधूनमधून हल्ले होतात. पण तुमच्यासारखे लोक तिथें गेले तरी त्यांना भीति नाहीं. बड्या भांडवलदारांवर आणि युरोपियन मळेवाल्यांवरच कम्युनिस्ट दहशतवाद्यांचा दांत आहे. तुम्हांला कांहीं करणार नाहींत ते!'

धक्क्यावर धांवपळ करीत असलेल्या यात्र्यांवरून माल चढवीतउतरीत असलेल्या मजुरांकडे पाहतांना आपण मद्रासकडल्या एखाद्या बंदरांत आहोंत असें वाटत होतें. बहुतेक मजूर मद्रासकडले तामीळ होते. शेंपन्नास मजुरांत दोनचारच ठेंगू, बारीक डोळ्याचे गुरख्यांसारखे दिसत होते. हे एतद्देशीय मलायी. सेल्वरत्नम् म्हणाले, 'मलायी लोक एकंदरींत फार आळशी. इथल्या मळ्यांत, कारखान्यांत तुम्हांला हिंदी तामीळ लोकच बरेचसे दिसतील. आपला पिढीजाद शेतीचा किंवा मासेमारीचा व्यवसाय करीत मलायी मिळेल तें खाऊन स्वस्थ राहतात. मोठे मळे, कारखाने, बँका, ब्रिटिशांच्या; व्यापार, उदीम, मजुरी यांत चिनी आणि हिंदी लोकांचा भरणा. मलायांत मोठं विचित्र त्रांगडं आहे. मलायांत मलायी लोक आतां अल्पसंख्याक झाले आहेत ! पिनांग, सिंगापूर सारख्या मोठमोठ्या बंदरांत आणि शहरांत चिनी लोकच बहुसंख्य आहेत. पण एकंदर मलायांत पंचेचाळीस टक्के मलायी, चाळीस टक्के चिनी आणि पंधरा टक्के हिंदी लोक असें प्रमाण आहे ! '

आपल्याकडे काथ्याची पायपुसणीं असतात तसले कसले तरी जाडजाड चौकोनी तुकड्यांचे ढीग धक्क्यावर दिसत होते आणि मजूर हातगाड्यांवरून इकडून तिकडे नेत होते. हें काय म्हणून सेल्वरत्नम्ना विचारलें, तेव्हां ते म्हणाले, 'हा मलायांतला रबर, हें तर मलायाचें धन ! जगांतले ऐंशीं ते नव्वद टक्के रबर मलायांत होतो हें तुम्हांला माहीत असेलच. '

## *सामुरिंगी-सामुरिंगी !*

पिनांगमधल्या पाहाण्यासारख्या स्थळांची माहिती देणारी कार्डें बोटीवर रात्रींच आम्हांला देण्यांत आलीं होतीं. ती हातांत घेऊन बाहेर पडण्याचा विचार करीत आम्ही डेकवर बसलों होतों. इतक्यांत दोन गुजराथी मुलगे एक पत्र हातांत घेऊन कुणाला तरी शोधीत डेकवर फिरत असलेले दिसले. ते आमच्या चांदूरकरांना शोधीत होते. चांदूरकरांचे चिरंजीव कांही महिन्यां-पूर्वीं पिनांगमध्यें येऊन गेले होते. त्या वेळीं पिनांगमधले एक प्रतिष्ठित हिंदी व्यापारी एस्. ठाकोरलाल यांची आणि त्यांची चांगली ओळख झाली होती. आपले वडील अमक्या बोटीनें अमक्या दिवशीं पिनांगला येताहेत म्हणून त्यांनीं ठाकोरलालांना पत्र लिहिलें होतें. पत्रासह चांदूरकरांना घरीं घेऊन

येण्याकरतां तें पत्र देऊन ठाकोरलालांनीं आपला भाचा मोहन आणि पेढीवरला दुसरा एक मुलगा रमण या दोघांना बोटीवर पाठवलें होतें. पिनांग पाहण्याचा आमचा प्रश्न इतक्या गोडपणें सुटलेला पाहून आम्हांला अतिशय आनंद झाला, आणि त्या दोन मुलांबरोबर आम्ही बोटीवरून खालीं आलों.

चुलिया स्ट्रीटमध्यें ठाकोरलालांचें घर व पेढी होती. हीं दोन मुलें अतिशय चलाख होतीं. बंदराबाहेर दोन माणसांची सोय असलेल्या पुष्कळ सायकल-रिक्शा उभ्या होत्या. चिनी रिक्शावाल्याबरोबर अस्खलित मलायी भाषेंत मोहन आणि रमण बोलत होते. 'सामुरिंगी', 'मामुरिगी', 'चुलिया स्ट्रीट' असे शब्द आमच्या कानांवर पडत होते. 'सामु' म्हणजे एक आणि 'रिंगी' म्हणजे 'डॉलर'. मलायी डॉलरची किंमत साधारणपणें एक रुपया नऊ आणे आहे. बोटीवर दहा रुपयांची नोट देऊन सहा डॉलर आणि चाळीस सेंट मीं घेतले होते. एका डॉलरचे शंभर सेंट. सेंटला मलायी लोक 'पैसा' म्हणतात. एका 'रिंगी' चे शंभर 'पैसे'. चिनी रिक्शावाल्यांची टोपी मोठी मजेदार दिसते. मध्यें लहानसा कळस असलेली, भल्या रुंद उथळ टोपलीमारखी विण-लेल्या वेताची ती असते. बारा महिने कडक ऊन आणि रोज संध्याकाळीं थोडाबहुत तरी पाऊस अशा या विषुववृत्ताजवळच्या प्रदेशांत हें शिरस्त्राण चांगलेच उपयोगी आहे.

दोन रिक्शा ठरवून एकीत मी आणि मोहन, दुसरीत चांदूरकर आणि बोबडे असे आम्ही चुलिया स्ट्रीटमध्यें जायला निघालों. रमण पायीच घरीं जातों म्हणाला. मुख्य रस्त्यावर आल्यावर चार्टर्ड बॅंकेची भव्य नवी इमारत आणि हाँगकाँग-शांघाय बॅंकिंग कॉर्पोरेशनची इमारत दिसली. पिनांगमधल्या लहानमोठ्या रस्त्यांवरून रिक्शा जात असतां एक गोष्ट ताबडतोब डोळ्यांत भरली. रस्त्यावर दिसणारी बहुतेक दुकानें चिन्यांचीं होतीं. लाल अक्षरांतल्या पांढऱ्या पाट्या किंवा काळ्या अक्षरांतल्या पिवळ्या पाट्या बहुतेक चिनी भाषेंतल्याच होत्या. एका गल्लींतल्या बऱ्याचशा चहाच्या हॉटेलांत आणि इतर दुकानांच्या गाद्यांवर मोपल्यांसारखे दिसणारे मद्रासी मुसलमान दिसले. दुकानांवरल्या इंग्रजी पाट्याहि अबूबकर, मुथू उस्मान अशा प्रकारच्या नांवांच्याच होत्या. पिनांग शहराचा हा दुकानें, पेढ्या, बाजाराचा भाग जुना असावा. डहाणू किंवा पालघरच्या बाजूला जशीं एकमजली लाकडी गॅलऱ्यांचीं

घरें दिसतात तसलींच घरें इथें दिसलीं. मात्र पालघर, डहाणूला नाहींत असे रुंद, स्वच्छ डांबरी रस्ते आणि मोटारी, ट्रॅमगाडया वगैरे इथें दिसत होत्या.

## पिनांगचे ठाकोरलाल

चुलिया स्ट्रीटमध्यें पेढीच्या मागल्याच प्रशस्त जागेंत ठाकोरलाल राहतात. आम्ही आंत गेल्याबरोबर लांब रेशमी सदरा आणि धोतर परिधान केलेल्या शांत, गौरवर्ण चेहऱ्याच्या, चाळिशीच्या आसपास असलेल्या ठाकोरलालांनीं अत्यंत आपुलकीनें आपल्या टेबलाजवळच्या खुर्च्यांवर आम्हांला बसवून घेतलें. अगदीं थोडया वेळांत आपल्या विशिष्ट व्यक्तित्वाची छाप पाडणारीं अशीं जीं कांहीं थोडीं माणसें मला आयुष्यांत भेटलीं आहेत त्यांत ठाकोरलालांची मी प्रामुख्यानें गणना करीन.

'आज रात्रीं बारापर्यंत म्हणजे बारा पंधरा तासच तुम्ही पिनांगमध्यें आहांत,' ते म्हणाले, 'पण तेवढ्या वेळांत सबंध पिनांग तुम्हांला दाखविण्याची मीं सोय केली आहे. आतां चहा घेऊन माझ्या मोटारींतून तुम्ही बाहेर पडायचं, आणि तारांच्या दोरखंडांनीं पंचवीसशें फूट वर ओढली जाणारी स्वित्झर्लंड-मधल्या रेल्वेसारखी डोंगरमाथ्यावर जाणारी जी फ्युनिक्युलर रेल्वे आहे तिनं पिनांगच्या हिल् स्टेशनवर जाऊन दुपारीं दीड दोनपर्यंत इथं जेवायला यायचं. रमण तुमच्याबरोबर येईल; तो सर्व कांहीं तुम्हांला दाखवील. दुपारीं जेवणा-नंतर तीन वाजतां बाहेर पडा, आणि तेरा मैलांवर असलेलं चिन्यांचं सर्प-मंदिर वगैरे शहरांत इतर जें कांहीं पाहण्यासारखं आहे तें या मुलांबरोबर पाहा.'

'बोटीवर जेवायची वगैरे आमची सर्व सोय आहे, दुपारीं आम्ही––' चांदूरकर बोलू लागले.

'तें कांही सांगू नका मला.' ठाकोरलाल त्यांना बोलूं न देतां म्हणाले, 'हिंदुस्थानांतून तुम्ही आलांत, आणि आपल्या पंक्तीचा लाभसुद्धां तुम्ही मला देणार नाहीं? माझ्या घरांतली मीठभाकरी जी कांहीं मी तुम्हांला देईन ती तुम्हीं घेतलीच पाहिजे.' त्यांच्यासमोर पुढें कांहीं बोलणें शक्यच नव्हतें.

इतक्यांत मसाले घातलेला गुजराथी चहा मुलांनीं आमच्यासमोर आणून ठेवला. पोटाचा त्रास असल्यामुळें ठाकोरलाल फारसा चहा घेत नाहींत.

टेबलावरले कागदपत्र चाळीत ते आमच्याशीं बोलत होते. कोपऱ्यांतल्या तिजोरीवर श्रीकमला आणि गणपतीचीं चित्रें फ्रेम करून लावलेलीं होतीं. दुसऱ्या कोपऱ्यांतल्या भिंतीवर गांधीजी आणि जवाहरलाल यांच्या तसबिरी होत्या. खुर्चीच्या मागें भिंतीच्या मध्यावर दुसऱ्या एलिझाबेथ राणीचें चित्र होतें. मलायांत, पूर्वी हिंदुस्थानांत होतें तसें ब्रिटिशांचें राज्य सध्यां दृढमूल आहे या गोष्टीची तें चित्र आठवण करून देत होतें. ठाकोरलालांचा गुळगुळीत स्मश्रू केलेला उजळ चेहेरा, सोनेरी फ्रेमच्या चष्म्यांतून समोर पाहात धिम्या, शांत, आत्मविश्वासपूर्ण आवाजांत बोलण्याची पद्धति, या सर्व गोष्टी मुंबईचे माजी मुख्यमंत्रि मोरारजीभाई यांची क्षणोक्षणीं मला आठवण करून देत होत्या. 'परमेश्वरावर दृढ विश्वास ठेवला आणि सतत काम केलें म्हणजे माणूस श्रीमंत झालाच पाहिजे,' ते आम्हांला सांगत होते. माझें साडेचार गुजराथी इयत्तांपलीकडे शिक्षण झालेलें नाहीं, असें ते म्हणाले तेव्हां मला धक्काच बसला! खरेंच वाटेना; कारण केवळ न अडखळतांच नव्हे तर चांगल्यापैकीं इंग्रजींत ते आमच्याशी बोलत होते. 'बाराव्या वर्षी मी मलायांत आलों नि गेली अठ्ठावीस वर्षे मलायांत आहें,' ते म्हणाले, 'इंग्रजींत सारा व्यवहार करावा लागतो, तेव्हां संवयीनें इंग्रजी बऱ्यापैकीं येतें इतकेंच.'

हिंदुस्थान आणि जपानहून कापड आयात करण्याचा ठाकोरलालांचा व्यापार आहे. सिंगापूरमध्येंहि त्यांची पेढी आहे. तिथला व्यवहार त्यांचा भाऊ पाहातो. दुसऱ्या एका चुलत भावाचा फार मोठा व्यापार मलायांत आहे. त्यांत कित्येक वर्षे ठाकोरलाल पहिल्यांदा भागीदार होते. पुढें पटेनासें झालें तेव्हां ती भागीदारी सोडून गेल्या तीनचार वर्षांपासूनच त्यांनीं स्वतंत्र धंदा सुरू केला आहे. 'त्यांना मी नकोसा झालों तेव्हां मी बाहेर पडलों,—' ते सांगत होते, 'आणि फारकतीच्या कोऱ्या करारावर सही करून दिली.

मलायाचे प्रख्यात बॅरिस्टर राम्मुनी, चौऱ्यांशीं वर्षांचे वयोवृद्ध कायदेपंडित कुमारस्वामी वगैरे आमच्या पेढीचे सल्लागार होते. पण मला कायदाकोर्ट नको होतीं. इतर भागीदारांनीं जें कांहीं थोडें दिलें तें घेऊन मी बाहेर पडलों. दोन-तीन वर्षांत माझा उत्तम जम बसला आहे. पहांटेपासून रात्रीपर्यंत मी स्वतः काम करतों. कारकून, मॅनेजर कुणी नाहींत. माझा हा भाचा मोहन आणि तो रमण पांचवी की सहावी गुजराथेंत शिकत होते. त्यांना इथें बोलावून

घेऊन धंद्यांत घेतलें. एक-दोन वर्षांत ते चांगलेच तयार झाले आहेत. इंग्रजी पत्रव्यवहार, टायपिंग वगैरे सर्व कांहीं तेच करतात. बाहेरचे कारकून आणि मॅनेजर हवेत कशाला ? रोज सकाळीं मी नेमानें प्रार्थना करतों, आणि स्नान-गृहांत विष्णुसहस्रनाम पुरं करतों. माणसं काम करीत नाहींत म्हणून गरीब राहतात असं माझं स्पष्ट मत आहे ! '

## *आझाद हिंद फौजेंत ठाकोरलाल*

पिनांगमधल्या रामकृष्ण आश्रमाचे आणि मर्चंट्स् चेंबरचेहि ठाकोरलाल उपाध्यक्ष आहेत. रामकृष्ण आश्रमाचे स्वामी श्रीसदानंद यांच्याशीं त्यांचा नेहमीं पत्रव्यवहार चालतो. पिनांगमध्यें येणाऱ्या बड्या लोकांच्या आदर-सत्कारांत ठाकोरलालांचाच पुढाकार असतो. जपानला जातांना जनरल श्रीनागेश पिनांगमध्यें उतरले होते. त्यांच्या सत्काराचा मोठा समारंभ ठाकोर-लालांनीं केला होता. जवाहरलाल आणि विजयालक्ष्मी पिनांगला येऊन गेलीं त्या वेळचे त्यांना हार घालीत असतांनाचे किंवा त्यांच्यासमवेत उभे असतांनाचे आपले बरेच फोटो त्यांनीं आम्हांला दाखविले.

गेल्या महायुद्धांत १९४२ साली मलाया जपान्यांनीं घेतला आणि पुन्हा ब्रिटिश येईपर्यंत दोन तीन वर्षें मलायांत जपान्यांचेंच राज्य होतें. याच काळांत सुभाषबाबूंनी आझाद हिंद सेना उभी करून सिंगापूर येथें स्वतंत्र भारत सरकारची घोषणा केली. त्या काळांतले ठाकोरलालांचे अनुभव एखाद्या अद्भुतरम्य कथेंत शोभण्यासारखे आहेत. आमच्यासमोर बसून शांत धिम्या आवाजांत आमच्याशीं बोलणारा हा हिशेबी व्यापारी गृहस्थ सुभाषबाबूंच्या आझाद हिंद सेनेंत फायनान्स सब् ऑफिसर आणि सिग्नलर म्हणून काम करीत होता, मलाया–ब्रह्मदेशाच्या निबिड जंगलांतून त्यांनीं पायपीट केली आणि अनेक प्राणसंकटें त्यांच्यावर आलीं यावर कुणाचा सहजासहजीं विश्वास बसला नसता.

पिनांगवर जपानचा पहिला वैमानिक हल्ला झाला तेव्हां हजार घरें भस्मसात् झालीं. आणि ठाकोरलालांच्या मतें कमींत कमी आठ हजार लोक ठार झाले. सुभाषबाबूंच्या आझाद हिंद सेनेंतून मलाया, थायलँडमधलीं जंगलें तुडवीत ठाकोरलाल ब्रह्मदेशांतील मर्गुईपर्यंत गेले. तिथून आझाद हिंद सेना मणि-पूरला पोहोंचली. या इथेंच सुभाषबाबूंनीं आपल्या सेनेला उद्देशून तें गाजलेलें

भाषण केलें; "...त्या तिथें--त्या डोंगरांच्या पलीकडे आपली मातृभूमि आहे...आपण तिला स्वतंत्र करूं किंवा मरून तरी जाऊं..." जपान्यांचा पराभव झाला आणि आझाद हिंद सेनेची पांगापांग झाली तेव्हां ठाकोरलाल ब्रह्मदेशांत होते. सैनिकाचा गणवेष अंगावर नव्हताच. ब्रिटिश लष्करानें पकडून त्यांची उलटतपासणी केली तेव्हां आपणाला इंग्रजी मुळींच समजत नाहीं, कोण काय हेंहि सांगतां येत नाहीं, अशी बतावणी करून ते सुटले. त्यानंतर बारा महिने ते रंगूनमध्यें होते. आझाद हिंद सेनेंतल्या त्यांच्या हाताखालीं काम करणाऱ्या दहाबारा लोकांना ब्रह्मदेशांतून गुपचूप भारतांत जावयाला त्यांनीं साहाय्य केलें. सैन्यांतलें काम संपल्यावर त्याच्यातला व्यापारी पुन्हा जागा झाला. 'बारीकसारीक व्यापार करून ब्रह्मदेशांतल्या त्या बारा महिन्यांत मी जवळजवळ बारा हजार रुपये कमावले,' ते म्हणाले !

## *ब्रह्मदेशांत रामनाम !*

ब्रह्मदेशांत आझाद हिंद सेना गेली त्या वेळचा एक रोमांचकारी अनुभव त्यांनी सांगितला. ठाकोरलाल आणि त्यांच्याबरोबरचे कांही सैनिक मर्तबानच्या आखातांतून एका होडीनें पलीकडे जात होते. समुद्रांत मध्यभागीं होडी असतां ब्रिटिशांची बाँबफेंकी विमानें आलीं आणि होडीवर बाँब टाकूं लागलीं. त्यांच्या बरोबरच्या कांहीं लोकांनीं भीतीनें गांगरून जाऊन पाण्यांत उड्या टाकल्या आणि ते बुडून मेले. 'मला पोहतां येत नव्हतें,' ठाकोरलाल सांगत होते, 'तेव्हां स्वस्थ बसून देवाचें नांव कां घेऊं नये असा विचार करून मी शांतपणें रामनामाचा जप करूं लागलों. होडीवर एकहि बाँब नेमका पडला नाहीं. आजूबाजूला पडलेल्या बाँबनीं पोहत जात होते ते ठार झाले.'

"अठ्ठावीस वर्षें मी मलायांत असलों तरी मी अजूनहि हिंदी नागरिक आहें आणि माझा पासपोर्टहि हिंदी आहे," ते म्हणाले, "माझीं मुलें इथें जन्मलीं, तेव्हां तीं मलायाचीं नागरिक आहेत." मलायांतल्या शिक्षणासंबंधीं बोलत असतां पहिल्यापासून ज्या पेढींत ते भागीदार होते तिचा मालक असलेल्या त्यांच्या भावानें सिंगापूरच्या मलाया विद्यापीठाला चाळीस हजार डॉलरांची म्हणजे जवळजवळ साठ हजार रुपयांची देणगी दिल्याचें त्यांनीं सांगितलें. "माझेच पैसे त्यानें देणगी म्हणून दिले असं म्हटलं पाहिजे," ते मिस्किलपणें

म्हणाले, "कारण फारकतीच्या वेळीं माझ्या न्याय्य वांट्याचे पैसे मला मिळाले नव्हते ! "

## पिनांगमध्यें जतकर

इतक्यांत शोफर मोटर घेऊन आल्याचा निरोप आला. दहा वाजले होते. हिल स्टेशन पाहून दुपारीं एकदीडला परत यायचें म्हणजे आतां बाहेर पडायलाच हवें होतें. आमच्याबरोबर रमण येणार होता. मोटारीजवळ शोफर उभा होता. ठेंगणासा, दणकट, मजबूत बांध्याचा तो कृष्णवर्ण शोफर तामीळ असावा, असें आम्हांला वाटलें. आम्ही त्याच्याशीं कांहीं तरी हिंदींत बोलूं लागलों. ठाकोरलाल हंसून म्हणाले, "अहो, त्याच्याशीं हिंदीत कशाला बोलतां ? तो तुमचा मराठी माणूस आहे ! "

"अरेच्या ! " मी म्हणालों, "काय हो, तुम्ही कुठले ? "

"मी जतचा, आप्पा हणमाने ! " तो मर्द मराठा म्हणाला, "पलटणींतून सुटलों नि ह्यांच्याकडे ऱ्हायलों."

"अस्सं ? " मीं विचारलें, "आणखी मराठी लोक इथं पिनांगमध्यें कुणी आहेत का ? "

"हितं न्हाईत्," तो म्हणाला, "पन् पूर्वी पलटनींत असलेले आपले तीस मराठे लोक सिंगापूर पोलिसांत हायेत."

## पिनांग, पिंशांग, बुंगा !

पिनांगचे डोंगर शहराच्या दुसऱ्या टोंकाला आहेत. डोंगराच्या पायथ्याशीं असलेल्या हिल् रेल्वेस्टेशनाकडे जाण्याकरतां जुनें शहर मागें टाकून नव्या उपनगरावरून जावें लागतें. जुन्या शहरांतून बाहेर पडल्याबरोबर स्वच्छ लांबरुंद रस्ते आणि भोंवतीं हिरव्यागार बागा असलेलीं छोटीं छोटीं टुमदार घरें दिसूं लागलीं. एका रस्त्यावर भल्यामोठ्या विस्तीर्ण हिरव्या गार आवारांत एक प्रशस्त लांबच लांब इमारत दिसली. या इमारतींतल्या मजल्यावर जवळजवळ खिडक्या दारें नाहींत कीं काय असा भास उत्पन्न करणारीं मोठमोठीं उघडीं दालनें दिसत होतीं. रमण म्हणाला, 'हें चिनी मुलांचें हांचँग हायस्कूल. इथल्या ऊष्ण हवेंत मुलांना त्रास होऊं नये आणि वारा खेळता राहावा म्हणून

हे असे प्रशस्त उघडे वर्ग ठेवले आहेत.' मोठमोठे घड्याळाचे मनोरे असलेल्या, चुंगलिंग हायस्कूल, चिनी मुलींचें हायस्कूल वगैरेच्या भव्य इमारती पुढें दिसल्या. मलायांत मलायी लोकांइतकेंच चिनी आहेत इतकेंच नव्हे तर मलायांतले बरेचसे उद्योगधंदे, व्यापार वगैरे त्यांच्याच हातीं आहे. त्यामुळें इथला सधन वर्ग चिन्यांचाच आहे. शाळा-कॉलेजांसाठी मोठमोठ्या इमारती त्यांनीं बांधल्या आहेत. बागबगीचे असलेलीं टुमदार सुंदर घरें चिन्यांचींच होतीं. रस्त्यावर हातगाड्यांतून शेंगा, केळीं किंवा मटनमाशांचे खाद्य पदार्थ विकीत फिरणारे चिनीच होते. बरीचशीं सोडा-लेमन-चहाचीं दुकानें चिन्यांचींच दिसत होतीं. पाहावें तिथें चिनी स्त्रीपुरुष किंवा अधूनमधून आमचे तामीळ हिंदी भाई दिसत होते. 'हा मलाया ना ?' मीं रमणला विचारलें, 'मग मलायी लोक कुठं आहेत ? रस्त्यांत, दुकानांत तर कुणीच मलायी दिसत नाहींत.'

'आहेत तसे मलायी,' तो म्हणाला, 'पोलिसांत किंवा मजुरांत दिसतील थोडे तुम्हांला, पण पिनांग किंवा सिंगापूरसारख्या शहरांत चिनी फारच आहेत. मलायाच्या मुख्य भूमीवर खेड्यापाड्यांत मलायी लोक जास्त दिसतील.'

स्वच्छ पांढऱ्या भिंती आणि निळ्या रंगाचे खांब, खिडक्या असलेली एक लांबचलांब नवी इमारत, मांस आणि मासे विकण्याचें मार्केट आहे असें कळलें तेव्हां आश्चर्य वाटलें. मार्केटची इतकी स्वच्छ आणि सुरेख इमारत आतां-पर्यंत मी कुठें पाहिलेली नव्हती. एका, एकमजली प्रशस्त हॉटेलांत टेबल-खुर्च्यांभोंवतीं स्वच्छ पांढरे कपडे घातलेले बरेचसे चिनी वावरत असलेले दिसले. रंगीबेरंगी कागदाचे चिनी दिवे हॉटेलच्या भोंवतीं ठिकठिकाणीं लट-कवलेले होते. कुणातरी चिन्याच्या लग्नाची मेजवानी तिथें होती.

आतां इमारती तुरळक झाल्या होत्या. समोर हिरव्यागार डोंगरांच्या रांगा दिसत होत्या. आम्ही गांवाबाहेरच्या खुल्या भागांत आलों होतों. भव्य वृक्षांची हिरवीगार झाडी आणि नारळी-पोफळींचीं दाट बनें पाहावें तिथें दिसत होतीं. विषुववृत्ताजवळच्या या प्रदेशांत बारा महिने एकच ऋतु असतो म्हणे. ऊन कडक पडतें; पण दररोज किंवा फार तर एकदोन दिवसांआड दुपारीं चारपांच नंतर पाऊस पडून जातो. त्यामुळें रस्त्यांत धूळ कुठें दिसत नाहीं. बारा महिने जिकडेतिकडे हिरवेंगार गवत आणि गर्द काळसर हिरवी झाडी दिसते. हें पाहून

इंग्लंडमध्यें आल्यासारखा पहिल्यांदा भास होतो, पण इंग्लंड जितकें बारा महिने थंड तितकेंच इथें बारा महिने ऊष्ण! नारळी-पोफळी-केळींचीं दाट बनें, फणसासारखीं दिसणारीं फळें पाहून कोंकणांत आहों असें वाटतें. कोंकणांत नव्हे महाकोंकणांत—कारण इथल्या नारळी, पोफळी, केळी कोंकणांतल्या-पेक्षां संख्येनेंच नव्हे तर आकारानेंहि मोठ्या आहेत. लालसर पिंवळ्या रंगाचा भला मोठा रुंदट गोल नारळ, काळसर हिरव्या रंगाच्या लांबलांब पानांच्या भल्या मोठ्या केळी. आपल्याकडल्या नारळी पोफळी लहान आणि त्यांचे बुंधे जुनाट काळसर दिसतात. इथें बारा महिने पाऊस असल्यामुळें कीं काय बुंधे भरदारच नव्हे तर स्वच्छ पांढरट काळे, ताजे टवटवीत दिसतात, म्हणून हें महाकोंकण! या पिनांगमध्यें पोफळी फार. 'पिनांग' या शब्दाचा अर्थच मुळीं मलायी भाषेंत सुपारी आहे म्हणे. 'पिशांग' म्हणजे केळीं, 'बुगा' म्हणजे फूल. हां हां म्हणतां बरेंच मलायी शिकलों मी!

## *पिनांगचीं डोंगरगाडी*

हिल् रेल्वेस्टेशनच्या दाराशीं येऊन पोहोंचलों तेव्हां साडे अकरा वाजले होते. आज रविवारचा दिवस असल्यामुळें डोंगरमाथ्यावर हवेच्या ठिकाणीं सहलीकरतां जाणारे बरेच चिनी विद्यार्थी आणि खाद्यपेयांनीं भरलेल्या वेताच्या टोपल्या बरोबर असलेलीं तरुण चिनी जोडपीं स्टेशनांत दिसत होतीं. स्टेशनच्या आवारांत चिनी पोरें आईस्-फ्रूट विकीत होतीं. दर पंधरा मिनिटांनी वर जायला गाडी असते. पहिल्या वर्गाचीं तिकिटें रमणनें घेतलीं; आज सुट्टीचा दिवस म्हणून तिकिट निम्मे दरानें मिळालें. पंधरावीस मिनिटेंच गाडीची वाट पाहात स्टेशनांत उभें राहावें लागलें; पण तेवढ्यांत घामाच्या धारा वाहूं लागल्या. सगळें हिरवेंगार आहे पण थंड नाहीं! स्टेशन चिमुकलें आहे. दोनच रूळ आणि पाण्याचे पाईप डोंगरावरून सरळ खालीं येतात तसे. इंजिनाच्या गाडीसाठीं थोडा थोडा चढ असलेला रस्ता डोंगराच्या बाजूबाजूनें वळणें घेतघेत करावा लागतो. ही गाडी तारेच्या भल्या मोठ्या दोरखंडानें सरळ पंचवीसशें फूट म्हणजे खंडाळ्याच्या घाटापेक्षांहि उंच—वर ओढली जाते; म्हणून पाईपासारखे सरळ रूळ टाकलेत. दोनचार डब्यांची गाडी चढत्या रूळावर तिरकसच उभी असते. रुळांच्या मध्यें फूट फूट रुंदीच्या भल्या जाड

कप्प्या दहा दहा फूट अंतरावर आडव्या असतात. त्यांच्या वरून जाणाऱ्या जाडजूड तारांचे दोरखंड डब्यांना विजेच्या शक्तीनें वर ओढतात.

ब्रेकची वगैरे व्यवस्था अशी कांहीं आहे कीं दोर तुटले तरी गाडी घसरून कोसळणार नाहीं. स्टेशनांतले खाकी कपडयांतले बहुतेक नोकर चिनी किंवा तामीळ दिसले. दरवाजाशीं उभा असलेला दरवान दाढीवाला शीख होता. खाकी शॉर्ट आणि शर्टमधला, डोक्यावर मुंबईच्या ट्रॅम-कंडक्टरच्या सारखी वाटोळी काळी टोपी असलेला पोलीस मात्र गुरख्यासारखा दिसणारा मलायी होता.

डोंगरावर गाडी सरसर वर जाऊं लागली. पांचशें फुटांची पाटी दिसली. कांही वेळानें हजार फुटांची पाटी आली. एका छोटयाशा बोगद्यांतून बाहेर आल्यावर 'टनेल' स्टेशनांत गाडी उभी राहिली. मध्येंच एक 'क्लेअरमाँट्' नांवाचें स्टेशन लागलें. डोंगरावरल्या गर्द झाडींत छोटया छोटया सपाटीवर एखादा दुसरा बंगला किंवा चिनी बायका-मुलें वावरत असलेल्या झोंपडया दिसत. 'टनेल' स्टेशनांत सहलीसाठीं चाललेले चिनी विद्यार्थी आणि चिनी जोडपीं उतरलीं.

## चतुर्भाषिक मलाया !

हजारपंधराशें फूट उंचीवरून पिनांग शहरांतल्या घरांचीं तांबडीं छपरें, पांढऱ्या घरांचे पुंजके, बंदरापासून पलीकडल्या मलायाच्या मुख्य भूमीपर्यंत गेलेला निळसर समुद्राचा फांटा, हा देखावा एखाद्या चित्रांतल्यासारखा दिसत होता. मध्येंच दोनचार काळेपांढरे ढग आमच्या खालून जाऊं लागले, आणि खालचें कांहींच दिसेनासें झालें. गाडी वर जात असतां डोंगरावर ओळखीचीं चांफ्याचीं झाडें एके ठिकाणीं दिसलीं. एका झाडाला रामफळांसारखीं पण वर फणसाच्या कांटयासारखे कांटे असलेलीं फळें दिसलीं. या फळांचें नांव 'आसोंका' कीं असेंच कांहींसें रमणनें सांगितलें. 'आंत फणसासारखेच पाढरट रंगाचे गरे असतात,' तो म्हणाला. जांभळयापिवळया रंगांचीं फारच सुंदर फुलें असलेलें एक नवीनच झाड मध्येंच दिसलें. पंधराशें फुटांवर आल्यावर गाडी बदलावयाची असते. बाजूलाच दुसरी गाडी होती. तिच्यांत जाऊन बसावयाचें, आणि शेवटचे हजार फूट तिच्यांतून वर जावयाचें. वर जाऊन

पोहोंचल्यावर दाट हिरव्या झाडींतले टुमदार बंगले, वरखालीं जाणारे स्वच्छ चिमुकले रस्ते, पांढऱ्या भिंती आणि तपकिरी खिडक्यांचें रेखीव पोलीस स्टेशन हें सर्व पाहून थंड हवेच्या ठिकाणीं आल्यासारखें वाटलें. पण पंचवीसशें फुटांवरसुद्धां इथें फारसें थंड नव्हतें. इथल्या 'समिट्‌रोड' वरून फिरतांना कांहीं मजेदार झाडें मला दिसलीं. डोंगरकपारींत वाढलेले किंवा कुंडयांतले चिंचेसारख्या बारीक पानांचे नेचे आपण पाहातों. फुलांच्या गुच्छाभोंवतीं हे हिरवे नेचे लावतात. इथें मोठीं उंच वाढलेली झाडें आणि त्यांच्या फांद्या नेच्यासारख्या होत्या. दुसरें एक झाड दिसलें; त्याला भेंडयासारखें लांबट खालीं टोंक करून लोंबत असलेलें, देंठाकडे लाल आणि टोंकाकडे पांढऱ्या रंगाचें फूल होतें. इथें रस्त्यांतल्या पाटयांवर चार भाषा दिसतात. अरबी लिपींत लिहिलेली मलायी भाषा, तिच्या खालीं चिनी, तिच्या खालीं तामीळ आणि शेवटीं इंग्रजी. भिन्नभाषिक उपऱ्यांची गर्दी झाल्यामुळें मलायी राष्ट्राच्या भवितव्याची काळजीच वाटते !

खालीं उतरतांना एक रबराचें झाड दिसलें. कोणत्याहि झाडासारखें मोठया पानांचें उंच झाड होतें. बुंध्याभोंवतीं साल खरवडून चार बोटें रुंदीचा पट्टा केलेला दिसत होता. त्या पट्टयांत एक बोटभर लांबीचा वांकवलेला पत्रा खोंचलेला होता. त्याच्या खालीं तारेनें बांधलेलें एक पत्र्याचें डबडें होतें. या डबडयांत रात्रभर दुधासारखा पांढरा चीक ठिबकतो. तो सुकवला कीं रबर झाला.

आमच्या डब्यांत समोरच्या बांकावर चिनी पद्धतीचा तंग फ्रॉक घातलेली एक अतिशय सुंदर चिनी तरुणी आणि अद्यावत् शर्टपॅंट घातलेला, उत्कृष्ट इंग्रजी बोलत असलेला एक चिनी तरुण बसला होता. बरेंचसें आयुष्य ऊष्ण देशांत काढल्यामुळें काळवंडलेला आणि खडबडीत झालेला, खाकी शिकारी वेषांतला एक निळया डोळयांचा उंचेला इंग्रज त्या दोघांबरोबर गोष्टी करीत होता. तो सांगत होता, "जुन्या गॅझेटमध्यें मीं वाचलें कीं, इथें शंभर वर्षांपूर्वी चौदा हजार एकर जमिनींत लवंग आणि जायफळ पिकवलें जात असे. अलीकडे फक्त दोनशें ऐंशीं एकर जमीन त्या पिकासाठीं वापरतात."

डोंगरांत एके ठिकाणीं एक मलायी म्हातारी चणे विकायला बसली होती. आपण ज्याप्रमाणें कागदाचा निमुळता पुडा चणेकुरमुऱ्यांकरतां करतों तसाच

पण पानांचा पुडा करून ती चणे देत होती. आम्ही पायथ्याशीं आलों तेव्हां दुपारचा दीड वाजला होता.

## मोहन आणि रमण

बसमधून घरीं जायला निघालों. पण रेल्वेस्टेशनापासून बसस्टेशनापर्यंत ट्रॅमनें जावें लागलें. इथल्या ट्रॅम्स अगदींच लहान आणि खडबडीत आहेत. बांकावर जागा नसली तर मागल्या बाजूला एक गॅलरी असते तिथें उभें राहायचें. गॅलरींत उभें राहून रस्त्यावरील मजा पाहाणें मात्र चांगलें जमतें. गांवाजवळ आल्यावर तामीळ लोकांचें एक जुनें भद्रादेवीचें देऊळ एका गल्लीच्या तोंडावर दिसतें. गणपतीहि एके ठिकाणीं दिसला. विडा खाऊन रस्त्यांत थुंकणारे कांहीं तामीळ भाईवंद दिसले तेव्हां तर हिंदुस्थानांतच आहों असें वाटलें. एका घरावर 'पिनांग हिंदु सभा' अशी इंग्रजी पाटी दिसली. दुसऱ्या एका घरावर 'पिनांग इंडियन काऊज् मिल्क ट्रेडिंग अॅसोसिएशन' अशी पाटी होती! चुलिया स्ट्रीटमध्यें ठाकोरलालांच्या घरीं पोहोंचलों तेव्हां दोन वाजले होते.

ठाकोरलाल आमची वाटच पाहात होते. घर सोडल्यापासून भात, भाजी, आमटीचें जेवण मिळालें नव्हतें. फुलके, भाज्या, भात, पुरणपोळी, ताकाची कढी वगैरेवर हात मारतांना समाधान वाटलें. जेवल्यानंतर थोड्या वेळानें म्हणजे तीनच्या मुमारास पुन्हा बाहेर पडावयाचें होतें. ठाकोरलालांची गाडी त्यांच्या मित्राच्या बायकोचें ऑपरेशन असल्यामुळें तिकडे गेली होती. दुसऱ्या एका मित्राची मोठी थोरली प्लिमथ गाडी त्यांनीं आमच्यासाठीं बोलावून ठेवली होती. या वेळीं रमण आणि त्यांचा भाचा मोहन दोघेहि आमच्या बरोबर येणार होते. तीनला आम्ही बाहेर पडलों. मोहनचें वय अठराएकोणीस वर्षांचें असेल. दोनतीन वर्षांपूर्वीं या मुलांना ठाकोरलालांनीं पिनांगला बोलावून घेतलें. मोहन फार चलाख पोरगा आहे. दोनतीन गुजराथी इयत्तांपलीकडे त्याचें शिक्षण झालेलें नाहीं. पण धंद्यांतल्या, गांवांतल्या हजार गोष्टी तो आम्हांला सांगत होता. मलायी, हिंदी, इंग्रजी या तिन्ही भाषा तो कामापुरत्या वापरूं शकत होता. 'स्वयंपाक करणें,झाडू मारणें या कामापासून तों पत्रें टाईप करणें, हिशोब ठेवणें या कामापर्यंत वेळप्रसंगीं आपण वाटेल तें करूं शकतों' म्हणून तो सांगत होता. 'दिवसभर खूप काम केलें म्हणजे मला शांति वाटते',

तो म्हणाला. मामाच्या तालमींत तो चांगलाच तयार झाला होता. बारा-तेरा मैल दूर असलेल्या बायेन लबस भागांत असलेलें चिनी लोकांचें सर्प मंदिर आधीं पाहावयाचें आम्हीं ठरविलें होतें. वाटेंत खेडवळ विभागांतून जातांना चिनी लोकांचीं झोपडीवजा लांकडी घरें दिसलीं. या घरांची रचना मजेदार होती. जमिनींत हात दोन हात उंच खांब पुरलेले, त्या खांबावर तक्तपोशी आणि खोल्या. एक खोली दोन हात उंचीच्या खांबावर, तर दुसरी वरच्या मजल्यासारखी दिसणारी चार हात उंचीच्या खांबावर! कांहीं पक्की वीटचुन्यांचीं टुमदार घरेंहि अशींच खांबांच्या पायांवर बांधलेलीं दिसलीं, बारा महिने पाऊस,—तेव्हां ओलसरपणा घरांत येऊं नये म्हणून या पद्धतीनें घरें बांधतात कीं काय नकळे.

## *चिन्यांचें सर्पमंदिर*

चिन्यांचें सर्पमंदिर हें एक अजब देऊळ आहे. चीनमध्यें किंवा इतरत्र कुठें बुद्ध धर्म आहे तिथें असलें दुसरें एखादें देऊळ आहे की नाहीं याची मला कल्पना नाहीं. देऊळ तसें मोठें नाहीं, पण बरेंच जुनाट दिसतें. त्याची रचना अर्थात् कानटोपीच्या वर केलेल्या कानांसारख्या छपरांची आहे. दरवाजा-समोर बाहेरच्या आवारांत दोन हातांच्या आंवाक्यांत मावणार नाहीं एवढ्या मोठ्या नक्षीकाम केलेल्या पितळेच्या भांड्यांत भस्म भरलेलें होतें आणि त्यांत बोटाएवढ्या जाड चंदनचूर्णाच्या उदबत्त्या जळत होत्या. आंतहि असल्याच भांड्यांत उदबत्त्या जळत असल्यामुळें जिकडे तिकडे धूर आणि चंदनाचा घमघमाट पसरला होता. आंतल्या जुनाट लाकडी खांबांवर चिनी पद्धतीची नक्षी होती. आंतलें सर्व कांहीं जुनाट, धुरकट, कोळिष्टकांनीं भरल्या-सारखें दिसत होतें. आंत छपराच्या एका कोंपऱ्यांत एक भली मोठी जुनाट घंटा आणि दुसऱ्या कोंपऱ्यांत एक काळवंडलेला नगारा टांगलेला होता. मधल्या चौथऱ्यावर दोन बाजूंना दोन पितळेच्या कुंड्या होत्या आणि त्यांत हात दीड हात उंचीचीं, पानें नसलेल्या शुष्क फांद्यांचीं झाडें होतीं. या फांद्यांवर आडवे पांढरे पट्टे असलेले हिरव्यागार रंगाचे लहान लहान साप वेटोळीं करून पडले होते. ते इतके निश्चल होते कीं, मला पहिल्यांदां वाटलें ते खेळांतले मातीचे रंगीत साप असावेत! पांचदहा मिनिटांनीं त्यांपैकीं एकानें डोकें

हालवलें आणि जिभेचीं दोन टोकें बाहेर काढलीं तेव्हां ते जिवंत आहेत याबद्दल आमची खात्री पटली. भिंतीला एक फळी होती तिच्यावर धूळ खात पडलेल्या कागदांत दोनतीन साप दिसले. तेही तसेच पडून होते. क्वचित् थोडीशी हालचाल करीत. एका कोपऱ्यांत पातळ लाल कागदांत गुंडाळलेल्या चंदनी उदबत्त्या विकणारा सुरकुतलेल्या चेहऱ्याचा म्हातारा चिनी बसला होता. त्याच्या पुढ्यांत एक जाडजूड लांब वही होती. तिच्यांत सही करावयाची आणि खुषी असेल तर सेवकाला कांहीं पैसे द्यायचे. त्याच्या डोक्यावरल्या फळीवर सुद्धां दोन तीन साप सुस्तपणें इकडून तिकडे वळवळत होते. त्यांच्या शेजारींच असलेल्या कांचेच्या बरणींत अंडी दिसली. सापांना अधूनमधून तीं खायला घालीत असावेत. नाहीतर तिथें पडल्या-पडल्या ते दुसरें खाणार तरी काय ? हे सर्व साप इतके सुस्त आणि पडल्या जागेवरून फारशी हालचाल न करणारे होते कीं त्यांची भीति अशी वाटेच ना. चांदूरकर म्हणाले, यांना अफू चारतात की भक्तांनीं सतत जळत ठेवलेल्या या चंदनी उदबत्त्यांच्या धुरामुळें ते असे कायमच्या गुंगीत रहातात कांहीं कळत नाहीं. एक गर्भवती चिनी स्त्री सापांच्या त्या कुंड्यासमोर गुडघे टेकून त्या जाड चंदनी उदबत्त्या भक्तिभावानें ओवाळीत होती. कांही म्हाताऱ्या चिनी बाया आपण देवाला नमस्कार करतों तसेंच हात जोडून त्या सापाना नमस्कार करीत होत्या !

देवळाच्या बाहेर पलीकडल्या बाजूला सर्व बाजूंनीं जाळी लावलेल्या एका टाकींत अजगरासारखें वेटोळें करून निश्चल पडलेले दोन प्रचंड साप होते. जाळींतून काठी घालून हालवलें तरी ते हालत नव्हते. टाकीजवळच्या एका कुंडींत छोटचा छोटचा हिरव्यागार पानांचें एक झुडूप होतें. त्याच्या फांद्यांना गुंडाळून घेऊन तीनचार साप पडले होते.

## आयेर इतेम्-काळें पाणीं

सर्पमंदिराकडून पिनांगचे हौशी लोक जिथें सुट्टीच्या दिवशीं सहलीकरितां जातात त्या ' वॉटर फॉल गार्डन्स 'कडे जायला आम्ही निघालों. ' ग्रीनलँड ' नांवाच्या हिरव्यागार डोंगराळ भागांतून आमची मोटार जात होती. या भागांत ब्रिटिश आणि चिनी श्रीमंतांचे सुंदर टुमदार बंगले आहेत. अर्धी भिंत पांढरी तर अर्धी तांबडचा विटांची अशा वेगवेगळचा कल्पना प्रत्येक बंगल्याच्या

बांधणींत दिसतात. वाटेंत रेसकोर्स लागला. हिरव्यागार डोंगराच्या पायथ्याशीं हें शर्यतीचें मैदान आहे. आणि त्याचें तारांचें कुंपणहि हिरव्यागार वेलींनीं भरून गेलें आहे. एके ठिकाणीं 'आयेर इतेम्' अशी इंग्रजी पाटी दिसली. मलायींत 'आयर' म्हणजे पाणी. मोहन म्हणाला, 'या भागाचें नांव 'आयर इतेम' किंवा 'काळें पाणी!' ही बाजू तर चांगली हिरवीगार सुंदर सुंदर बंगले असलेली होती!

## वॉटर फॉल् गार्डन्स

'वॉटर फॉल् गार्डन्स'चा विस्तार खूप मोठा आहे. डोंगरावरून कोसळत असलेला एक लहानसा धबधबा एका बाजूला आहे. फिरायला आलेल्या श्रीमंत चिनी किंवा युरोपियन लोकांच्या एकाहून एक सुंदर आणि भव्य मोटारगाड्या बाहेर उभ्या होत्या. आंत मोठमोठे वृक्ष, राया, लिली फुलांचें एक तळें (लिली-पाँड्), वरखालीं जाणारे डोंगराळ रस्ते आणि चिमुकले लाकडी पूल आहेत. बांबूमारखा उंच वर गेलेला सोट आणि नारळीच्या झावळ्यासारखीं पानें असलेलीं कांही झाडें इथें पाहिलीं. त्यांच्या बांबूमारख्या दिसणाऱ्या खोडांचा मुळापासून अर्ध्यापर्यंत हिरवागार रंग होता, तर वरच्या अर्ध्याचा कुणीं तरी रंगवल्यासारखा तांबडा लाल होता. चिमुकलीं माकडे इकडून तिकडे उड्या मारीत होतीं, जााणाऱ्यायेणाऱ्यांकडे कांहीं खायला मिळेल या आशेनें मध्येंच थांबून पाहात होतीं. एक हायलॅंडर सैनिक त्यांना शेंगा टाकीत होता. मोहननें कुठून तरी मंगीस्तान नांवाची फळें आमच्यासाठीं आणलीं होतीं. बाहेरून पीचसारख्या दिसणाऱ्या या फळांत रामफळासारख्या बिया होत्या. माकडापुढें हें फळ टाकलें तर तें ती खाईनात!

## चहा आणि खेंकडे

बागेच्या बाहेर पडलों आणि चहा कुठें चांगला मिळेल म्हणून मी इकडेतिकडे पाहूं लागलों. जवळच एक '[illegible]कॉंग' नांवाचें चिन्यांचें चहाचें दुकान दिसलें. दाराजवळच एक मोठी [illegible]रली काळ्या अक्षरांतली पिवळी पाटी होती; आणि तिच्यावर 'इथें दिवसां, रात्रीं, केव्हांहि समुद्रांतले ताजे खेंकडे मिळतात' असा इंग्रजी मजकूर होता! तांबड्या, काळ्या, पाठीवर

पांढरे ठिपके असलेल्या लांबलांब पायांच्या लहानमोठ्या खेंकड्यांची एक लांबच लांब माळ दाराशीं तोरणासारखी लावली होती! 'इथें चहा मिळेल ना?' मीं भीतभीत मोहनला विचारलें. 'हो हो, चहा मिळतो कीं इथें,' तो म्हणाला. आम्ही आंत गेलों तों सगळीं टेबलें चिनी तरुणतरुणींनीं भरून गेलीं होतीं. एखादा दुसराच चहा घेत होता. बाकी सर्वजण मोठमोठे उकडलेले खेंकडे दातांनी कडाकडा फोडण्यांत आणि बशींतल्या तांबड्या लाल चटणींत त्यांचें मांस बुडवून मटामट खाण्यांत गुतले होते. प्रत्येक टेबलावर खेंकड्यांच्या फुटक्या तुटक्या कवचांचे आणि चोखून टाकलेल्या पायांचे लहान लहान पुंजके इतस्ततः पसरले होते. आणखी आंत डोकावून पाहिलें तों भट्टी-जवळ चिनी आचारी उभा होता आणि मोठ्या थोरल्या टोपांत खेंकडे रटारटा उकडले जात होते! आंत बसायला जागा नव्हती म्हणून बाहेर उघड्या जागेंत असलेल्या एका रिकाम्या टेबलाशी जाऊन आम्हीं बसलों. नाहीं तरी आंत दरवळणाऱ्या खेंकड्यांच्या हिवस वासाने डोकें भणाणलेंच होतें! चहा ही चीजच मुळांत चिनी असल्यामुळे की काय न कळे, त्या दुकानांतला चहा मात्र खरोखरच चांगला होता.

## *चिन्यांचे ताबूत*

तिथून पुढें जात असतां वाटेंत एक मोठें थोरलें षण्मुख सुब्रह्मण्याचें देऊळ दिसलें. तिथें मोटार उभी करून आंत गेलों. कुणातरी श्रीमंत चेट्टियारानें हें बांधलें आहे म्हणतात. मंदिर मोठें आहे, पण वास्तुकलेच्या दृष्टीनें आंत बाहेर सर्व कांहीं भडक आणि सवंग अभिरुचीचें आहे. भल्या मोठ्या सभा-मंडपांतून पुढे गेलें कीं गाभारा दिसतो. तो लाल, निळ्या, पिंवळ्या फेदर-क्रीट किंवा कलरक्रीट सिमिटाचा आहे. नक्षीचे दगडी खांब किंवा महिरपी वगैरे कांही नाहींत. गाभाऱ्यांतल्या तामीळ पुजाऱ्यानें मोठ्या आस्थेनें भस्म आणि चंदनाचें गंध आम्हांला दिलें. प्रवेशद्वाराशीं लाकडांत कोरलेले या देवळाचे रंगीत द्वारपाल मात्र खूप मोठे आहेत.

या शहरांत चिनी लोकांच्या शाळा, बंगले, घरें, दुकानें ज्याप्रमाणें मोठ-मोठीं आहेत त्याप्रमाणेंच त्यांची स्मशानभूमीहि खूप विस्तीर्ण असून आंत थडगींहि असंख्य आहेत. जगणारे चिनी पुष्कळ आहेत, त्या अर्थी मरतातहि

पुष्कळ यांत आश्चर्य नाहीं! चिनी थडग्यांचा विशिष्ट आकार असतो. अर्ध-वर्तुळाकार वीत दीडवीत उंचीची पांढरी भिंत, आणि त्या भिंतींत मध्यें बसवलेला चौकोनी पांढरा दगड असतो, या दगडावर बहुधा मृताचें नांव कोरलेलें असावें. पिनांगच्या बाजारांत एके ठिकाणीं ताबुतासारखे उंचउंच कागदी मनोरे आम्हांला दिसले होते. चिन्यांच्या प्रेतयात्रेंत हे मनोरे ताबुता-सारखे मिरवत नेतात म्हणे.

## *पक्षी कां नाहींत ?*

सकाळीं हिल् स्टेशनवर गेलों होतों तेव्हां वरून खाली पाहातांना दूर एके ठिकाणीं हिरव्या गार झाडींत मोठमोठे दोन तीन पांढरे तलाव आणि त्यांतलें निळें पाणी दिसत होतें. पिनांग शहराला जिथून पाणी पुरवलें जातें तें हें 'गिलमार्ड रिझर्व्हायर.' चार ठिकाणीं पाण्याच्या चादरी या तलावांत पडत असतात. इथल्या छोटया छोटया इमारती आणि त्यांची घुमटें स्वच्छ पांढरीं आहेत तर खिडक्या-दारांचा रंग फिकट निळा आहे. पिनांगमधल्या मार्केटाचा आणि कांहीं ऐटदार दुकानांचा रंगहि असाच निळा-पांढरा आहे. स्वच्छ सूर्यप्रकाश आणि स्वच्छ निळें आकाश दररोज पाहाणाऱ्या या लोकांना या दोन रंगांची विशेष आवड दिसते! इथें कांहीं चमत्कारिक झाडें पाहिलीं. मोठमोठ्या पानांचीं हीं झाडें मुरूसारखीं उंच आहेत. बुंध्यापासून पांचसहा फुटांवर वर वळलेल्या रुंद पानांची खोडाभोंवती एक टोपली झालेली आणि या टोपलीच्या तळापासून खालीं, आकाशदिव्याच्या लोंबत्या शेपट्या असतात तशी लोंबणारी लांब हिरवीं पानें. कदाचित् मुख्य झाडावर उगवलेला हा बांडगुळाचा एखादा प्रकार असेल. पिनांगमध्यें आल्यापासून जिकडे तिकडे अमूप हिरवी झाडी दिसत होती, पण तिच्या मानानें पक्षी जवळजवळ दिसलेच नाहींत असें म्हटलें तरी चालेल. आम्ही या गोष्टीचें आश्चर्य करीत होतों. चांदूरकर म्हणत होते, इथें जिकडे तिकडे नारळी-पोफळींचा सुकाळ दिसतो—इतर पिकें कांहीं दिसतच नाहींत, तेव्हां पक्षी खाणार काय? म्हणून पक्षी नाहींत. या तलावाच्या आसपास मात्र चिमण्यांसारखे कांहीं थोडे पक्षी भुरभुरतांना दिसले.

## *ताजाँग बुंगा*

आतां आम्ही जात होतों त्या विभागाचें नांव 'बालेक् पुलाव'. समुद्रकांठीं मलबार हिलसारखी 'माऊन्ट प्लेझर' नांवाची टेकडी आहे. या टेकडीवर पोहण्याचा एक झोंकदार तलाव आहे, आणि तलावाच्या कांठाशींच एक ऐटदार हॉटेल आहे. श्रीमंन्त चिनी स्त्रीपुरुष मोटारींतून इथें मौज करायला आले होते. तलावाच्या काठांशीं खुर्च्या-टेबलांवर पेयें घेत ते बसले होते. रबराचे फुगवलेले रंगीत घोडे किंवा रंगीत रबरी फुगे घेऊन गुटगुटीत चिनी मुलें तलावांत मनसोक्त डुंबत होती.

जुहूसारख्या लांबच लांब समुद्रकिनाऱ्याशीं 'लोन पाईन' नांवाचें एक प्रख्यात हॉटेल एका एकान्त जागीं आहे. इथल्या युरोपियनांचें हें फार आवडतें हॉटेल. आम्ही सहज त्या बाजूला गेलों. कांही गोरे स्त्रीपुरुष बाहेर हिरवळी-वरल्या खुर्च्या-टेबलांशीं पेयें घेत बसले होते. पांढऱ्या शर्ट-विजारींतल्या एका धिप्पाड दाढीवाल्या साहेबाला पाहून कॉनरॅडच्या या प्रदेशाच्याच पार्श्वभूमीवर लिहिलेल्या कादंबऱ्यांतल्या कप्तानांची आठवण झाली. त्याच्या पायाला त्याचें छोटेसें काळें माकड चिकटून बसलें होतें. त्याच्या गळ्यांतली सांखळी ओढून तो त्याला 'खाली उतर' म्हणत होता. तें अधिकच घट्ट चिकटू लागलें. खुर्ची-वरून उठून त्यानें इकडे तिकडे धांवून पाहिलें. तें माकड त्याच्या पायाला तसेंच चिकटून राहिलें! 'लोन् पाईन' मधून बाहेर पडून रस्त्याला लागलों असतां एक भव्य बंगला दिसला. बागेच्या दारावर 'रामविलास' अशा नांवाची पाटी होती. कुणा तरी श्रीमंत तामिळाचा असावा.

## *आन्चौंगनें दाखविलेलें मंदिर*

दक्षिण फ्रान्समधल्या रिव्हिएराइतकाच प्रख्यात असलेल्या 'तांजाँग बुंगा' या पिनांगच्या समुद्रकिनाऱ्यानें आमची मोटार चालली होती. वैभव-शाली हॉटेलें आणि पोहण्याचे तलाव या किनाऱ्यावर इतस्ततः पसरलेले आहेत. 'ताजाँग बुंगा' म्हणजे, कुणीसा म्हणाला सर्व किनाऱ्यांचें फूल!

मुंबईच्या समुद्रकिनाऱ्याजवळून जाणारा जसा 'मरीन ड्राइव्ह' हा रस्ता आहे तसाच इथें 'गुर्नी ड्राइव्ह' आहे. या रस्त्यानें गांवांत जायला आम्ही वळलों. वाटेंत रबराच्या झाडांचा एक मळा दिसला. एका मोठ्या जुनाट

पिवळ्या इमारतीवर 'शांघाय अंडरग्राऊंड हॉटेल' असें नांव दिसलें. भूमिगत हॉटेल म्हणजे काय म्हणून मोहनला विचारलें. तो म्हणाला, 'खालीं तळघरांत छानदार खोल्या करून, खाण्यापिण्याची इथें व्यवस्था केली आहे.' पांढरीशुभ्र कितीतरी लांबरुंद पसरलेली एक सात मजली इमारत दिसली. हें पिनांगचें हॉस्पिटल. एका इमारतीवर 'पिनांग बुद्धिस्ट अॅसोसिएशन टेंपल' हें नांव वाचून आम्ही आंत गेलों. एखाद्या वाचनालयाची किंवा सभागृहाची इमारत असावी तशी ती लांबून दिसते. आवाराच्या आंत मोटारी उभ्या होत्या. प्रवेशद्वारासमोर आपल्या देवळांच्या दीपमाळेसारखा एक मनोरा होता आणि त्यावर, हिरवे, पिवळे, लाल विजेचे दिवे पेटत होते. तिथेंच एका मोठ्या थोरल्या नक्षीदार पितळेच्या भांड्यांत जाडजाड चंदनी उदबत्त्या जळत होत्या. आंत गेल्यावरसुद्धां कावसजी जहांगीर हॉलसारख्या भव्य सभागृहांत गेल्यासारखें वाटलें. प्रवेशद्वाराच्या डाव्या बाजूला एक खोली होती. तिच्यावर 'लेडीज्' अशी पाटी होती. सफेत कपडे घातलेल्या चिनी स्त्रिया आंत बसलेल्या दिसल्या. उजव्या बाजूच्या खोलीवर 'जेन्ट्स्' अशी पाटी होती. आंत स्वच्छ सफेत कपड्यांतले चिनी पुरुष वाचीत किंवा बोलत बसले होते.

मंदिराच्या स्वच्छ लाद्यांवर मोठमोठीं गुलाबी कमळें आणि कमळाच्या कळ्या यांच्या आकृति होत्या. चारी बाजूंच्या भिंतींवर बुद्धाच्या जीवनांतल्या निरनिराळ्या प्रसंगांवरचीं ग्रीक चेहऱ्यामोहऱ्यांचीं रंगीत चित्रें रांगेनें लावलेलीं होतीं. मंदिराच्या मध्यभागीं एक नक्षीकाम केलेला भव्य चौथरा आहे आणि त्यावर, उभें असलेल्या बुद्धाची पांढरी शुभ्र प्रचंड मूर्ति आहे. या मूर्तीच्या दोन बाजूंना दोन अशा दुसऱ्या मूर्ती आहेत. त्या बुद्ध-शिष्यांच्या असाव्यात. या बुद्धमूर्तीच्या मागें त्याच चौथऱ्यावर बसलेल्या बुद्धाची भव्य मूर्ति आहे. मूर्तीसमोर जमिनीवर रांगेनें छोट्या छोट्या चटया किंवा रंगीत कापडाच्या उशा टाकलेल्या दिसल्या. कांहीं चटयांवर जपमाळ घेऊन जप करीत बसलेल्या चिनी स्त्रिया दिसल्या, तर कांहींवर पुस्तक हातांत घेऊन मंत्रपठण करीत बसलेल्या स्त्रिया होत्या. बाहेर दीपमाळेसमोर किंवा आंत बुद्धमूर्तीसमोर गुडघे टेकून चंदनाच्या उदबत्त्या ओंवाळणाऱ्या किंवा तांबड्या रंगाच्या मेणबत्त्या पेटवून मूर्तीसमोर ठेवणाऱ्या बऱ्याच चिनी स्त्रिया दिसल्या. इकडेतिकडे पाहात आम्ही आंत फिरत असतां एक किड-

किडीत, गालफडें बसलेला चिनी माणूस आमच्या जवळ येऊन मोठ्या आस्थेनें मंदिराची माहिती अडखळत्या इंग्रजींत सांगूं लागला.

एका कोपऱ्यांत तेलाच्या बाटल्या दिसल्या. त्या कशाकरितां म्हणून विचारतां मूर्तीसमोरच्या दिव्यांत कांहीं भक्त हें तेल विकत घेऊन वाहातात, म्हणून त्यानें सांगितलें. तो म्हणाला, 'आतां सहा वाजले आहेत. साडेसातला तुम्ही परत याल तर तुम्हांला इथें एक व्याख्यान ऐकायला मिळेल. सिलोनहून एक 'थारा' (स्थविर ?) इथें आले आहेत. त्यांचें इंग्रजीत व्याख्यान होणार आहे. चिनी स्त्री-पुरुषांकरितां त्याचें ताबडतोब चिनी भाषेत भाषांतर सांगण्यांत येईल.' 'आम्हांला फार आनंद झाला असता, पण आम्हांला बोटीवर जायचें असल्यामुळें येतां येणार नाहीं त्याचें वाईट वाटतें.' आम्ही म्हणालों. 'आपण या मंदिरांत काम करतों, आपलें नांव आन्चाँग,' तो म्हणाला. फिरत फिरत मंदिराच्या मागल्या बाजूला आम्ही गेलों. तिथें एका मोठ्या थोरल्या दालनांत एक लांब टेबल व खुर्च्या होत्या. टेबलावर बरेचसे रंगीत कांचेचे कप होते आणि एका उभ्या भांड्यांत पाणी होतें. बऱ्याचशा चिनी म्हाताऱ्या तिथें शांतपणें बसलेल्या दिसल्या. मंदिर पाहून झाल्यावर आन्चाँगचे आम्हीं मनःपूर्वक आभार मानले, आणि बाहेर पडलों.

## मलायी-हिंदी-चिनी त्रांगडें

लालहिरवी फुलझाडें, डुलणाऱ्या आवारांत पिनांग पोलिसांचें मुख्य ठाणें दिसलें. त्या नव्या कोऱ्या भव्य पांढऱ्या इमारतीवरून आम्ही पिनांगच्या बाजारांत आलों. आतां काळोख पडत होता. कसला तरी असह्य उग्र दर्प मधूनमधून नाकांत शिरत होता. 'कसला रे हा वास ?' आम्हीं मोहनला विचारलें. तो म्हणाला, 'ती पाहा रस्त्यावर विकायला ठेवलीं आहेत त्या दुर्यान फळांचा हा दर्प आहे.' फणसासारखेच बाहेर कांटे असलेलें हें फळ आहे. फणसहि पिकूं लागला कीं त्याचा उग्र वास आजूबाजूंला पसरतो. पण दुर्यानच्या दर्पानें डोकें फिरून जातें. हे लोक आवडीनें हें फळ विकत घेऊन कसे खातात कुणाला ठाऊक !

एका तामीळ मुसलमानाच्या लहानशा पुस्तकांच्या दुकानांत वर्तमानपत्रें दिसलीं. 'संडे गॅझेट' आणि सिंगापूरचें 'इंडियन डेली न्यूज' मीं विकत

घेतलें. बातम्या तरी काय आहेत म्हणून पाहातां इकडल्या राजकारणांतल्या मलायी-हिंदी-चिनी भांगड्याचें चांगलेंच दर्शन झालें. मलायी ट्रेड यूनिअन काँग्रेसनें म्हणे लिखित नसला तरी असा अलिखित नियम मान्य केला होता, कीं, काँग्रेसच्या अध्यक्षस्थानीं एकदां मलायी, एकदां चिनी, एकदां हिंदी असे आळीपाळीनें अध्यक्ष निवडले जावे! केलान्तनच्या सुलतानाच्या अनेक बायकांपैकीं एकीनें कुठल्या तरी राजकीय सभेंत भाग घेतला म्हणून तिथली मलायी जनता खवळल्याची दुसरी बातमी होती! आशियाई चित्रपट महोत्सवांत नऊ जपानी आणि तीन मलायी चित्रपटांना बक्षिसें मिळालीं होतीं. एका मलायी चित्रपटाचें नांव 'सलामत हरि राया'! 'हरि राया' म्हणजे मोठा दिवस.

## *खळाशाचें मत*

सात सव्वासातच्या सुमारास ठाकोरलालांच्या घरीं पोहोंचलों. त्यांचे आणि त्यांच्या चलाख भाच्यांचे पुन्हापुन्हा आभार मानून आमच्या 'कॉर्फ्यु' बोटीकडे—म्हणजे आमच्या तरंगत्या घराकडे—जायला निघालों. वाटेंत पिनांगचें रेल्वे स्टेशन दिसलें. रेल्वेस्टेशन बंदराजवळच आहे. रेल्वे स्टेशन याचा अर्थ इथून रेल्वे जात नाहीं. इथें तिकिट घ्यायचें आणि लाँचमध्यें बसून समोर मलायाच्या मुख्य भूमीवरल्या स्टेशनांत जायचें. तिथून मलायाची राजधानी कुआलालंपूर किंवा सिंगापूरला जाण्याकरितां एक रात्रीं आणि एक सकाळीं अशा दोनच गाड्या सुटतात असें ऐकलें. रात्रीच्या गाडीची लाँच नुकतीच सुटून गेली होती आणि स्टेशनांत शुकशुकाट होता.

बोटीवर गेलों तेव्हां सव्वाआठ झाले होते. डायनिंग हॉलमध्यें जेवण्याकरितां गेलों तों पिनांगला चढलेले कांहीं नवे चिनी स्त्रीपुरुष तिथें जेवत असलेले दिसले. आम्ही बसलों त्या टेबलावर एक तरुण चिनी आणि एक चिनी स्त्री जेवत होतीं. आंतरराष्ट्रीय बॅडमिन्टनचे सामने सिंगापुरांत परवांपासून सुरू व्हायचे आहेत ते पाहायला तो चिनी तरुण चालला होता. 'तुमचा नंदू नाटेकर खेळणार आहे, त्याचा खेळ पाहायला मी फार उत्सुक आहें,' तो मोठ्या उत्साहानें आम्हांला सांगत होता. 'पिनांग म्युनिसिपालटींत आपण कामाला आहोंत, पण वृत्तपत्रांसाठीं परीक्षणेंहि लिहितों'. तो म्हणाला.

जेवल्यावर डेकवर येऊन बसलों तेव्हां थंड वाऱ्याच्या झुळुका येत होत्या. या विषुववृत्ताजवळच्या प्रदेशांतहि थंड झुळुका येतात म्हणायच्या केव्हां केव्हां ! वरतीं आकाशांत असंख्य निळसर पांढरे तारे लखलखत होते, आणि बंदरांतल्या अनेक बोटींवर लुकलुकणारे लाल, हिरवे, पांढरे दिवे त्यांच्याशीं पोरकट स्पर्धा करण्याचा प्रयत्न करीत होते !

बोट रात्रीं बारा वाजतां पिनांग बंदरांतून बाहेर पडली.

ता. २३ मे १९५५

आज सकाळीं डेकवर आलों तेव्हां समुद्र अगदीं शांत होता, पण उकाडा फार होत होता. सकाळीं ११-३० च्या सुमाराला समुद्रावर दूर दोन बोटी पुढें चालल्या आहेत आणि त्यांच्या मागून कांहीं अंतरावर एक मोठें थोरलें चौकोनी घर तरंगत येतें आहे असें दृश्य दिसत होतें. कांहीं वेळानें ध्वनि-क्षेपकावरून सांगण्यांत आलें कीं एक मोठी तरती गोदी त्या दोन बोटी ओढून नेत आहे.

आमच्या बोटीवर दमणचे बरेच खारवे खलाशी म्हणून आहेत. शिड्या लावणें, दोरखंड बांधणें, झाडलोट करणें वगैरे कामें ते करतात. त्यांचा सारंग उमद्या चेहेऱ्याचा धिप्पाड गडी आहे. लांब निळा झब्बा, कमरेला लाल फडकें, डोक्यावरल्या गोल पांढऱ्या टोपीभोंवतींहि लाल फडकें, गळ्यांतल्या लांब-लचक सांखळीला शिट्टी, अशा वेषांत तो खलाशांच्या कामावर देखरेख करीत असतो. त्याची भाषा गुजराथी असली तरी मराठीहि मोडकीतोडकी त्याला बोलतां येते. वर्तमानपत्रांत दमणची किंवा गोव्याची बातमी काय आहे याची पुष्कळ वेळां माझ्याकडे तो चौकशी करतो. बोटीवरल्या युरोपियन बायकांचे लांडे कपडे, त्यांचें कुणाबरोबरहि नाचणें, गाणें, गळ्यांत गळा घालून फिरणें यांसंबंधीं आज दुपारीं माझ्याबरोबर तो बोलत होता. ' देखो साब, ' तो म्हणाला, ' वीस वर्ष निरनिराळ्या बोटींवर कामं करतोंय, सर्व जग पाहचलं, पण आपल्या हिंदी बायकांसारख्या बायका नाहींत कुठं ! '

संध्याकाळीं ५ वाजतां डाव्या बाजूला किनारा आणि डोंगराच्या रांगा अस्पष्ट दिसत आहेत. रात्रीं साडेसातला तर किनाऱ्यावर पुष्कळसे लखलखीत निळे दिवे दिसूं लागले. कुणी म्हणाला, तें पोर्ट डिक्सन. आतां रात्रीं साडे-

आठच्या सुमाराला आम्ही मलाक्काच्या सामुद्रधुनीमधून जात आहोंत; आणि मधूनमधून दोन्ही बाजूना दीपगृहांचे प्रकाशझोत दिसत आहेत.

ता. २४ मे १९५५

## *सिंहपुरांत हत्तीं !*

सिंगापूर बंदराच्या धक्क्याजवळ बोट हळूहळू सरकत होती. सकाळचे आठ सव्वाआठच वाजले होते; पण विषुववृत्ताजवळचा सूर्य अंग भाजून काढूं लागला होता. सिंगापूर मुंबईसारखेंच बेट आहे. एका टोंकाला मुंबईच्या वाळकेश्वर-मलबारहिल भागासारख्याच दाट हिरव्या गार झाडीनें भरलेल्या भागांतल्या घरांचीं छपरें दिसत होतीं. समोर मुंबईच्या बॅलार्ड पियरसारखाच धक्का, यार्‍या, वखारी वगैरे दिसत होत्या. साडेआठला बोट धक्क्याला लागली. दोन दिवस सिंगापुरांत थांबणार. कपडे करून गांवांत जायच्या तयारींतच आम्ही होतों. भारतांतल्या युनायटेड् कमर्शियल बॅंकेच्या सिंगापूर शाखेचे मॅनेजर श्री. चिंतामणराव सोनाळकर यांना माझ्या मुंबईतल्या मित्रांनी पत्र लिहिलेलें होतें. उतरल्याबरोबर त्यांच्या ऑफिसांत जायचें ठरवलें होतें. डेकवरून धक्क्याकडे पाहात उभे होतों, इतक्यांत बोटीच्या शिडीवरून उंच, गोरटेलेसे, अद्यावत् पोशाख केलेले, हातावर कोटाची घडी टाकलेले एक गृहस्थ गर्दींतून वाट काढीत डेकवर आले, आणि इकडेतिकडे पाहूं लागले. माझ्याकडे पाहातांच 'तुम्हीच काणेकर ? ' म्हणून त्यांनी विचारलें. ते सोनाळकरच होते. मला न्यायला ते स्वत: गाडी घेऊन आले होते. बाहेर त्यांची मोठी थोरली शेव्हरोलेट गाडी उभी होती. सिंगापुरांत लहानसहान, जुन्या पुराण्या गाड्या दिसतच नाहींत. हें खुलें बंदर आहे. कसल्याच प्रकारची जकात नाहीं. त्यामुळें मोटारी, कॅमेरे, घड्याळें वगैरे वस्तू इथें मुंबईच्या मानानें निम्म्याहून कमी किंमतीला मिळतात.

मुंबईप्रमाणेंच सिंगापूर हें एक दलदलीनें भरलेलें कोळ्यांचें खेडें होतें. मुंबईप्रमाणेंच ब्रिटिशांनीं त्याला जगांतलें एक अव्वल दर्जाचें बंदर आणि शहर बनविलें. बंदराच्या बाहेर आल्यावर रस्ते, इमारती वगैरे पाहून कमी गर्दीच्या, पण अधिक व्यवस्थित अशा मुंबईंतच आल्यासारखें वाटलें. सोनाळकरांच्या एअर कंडिशंड ऑफिसांत चहापाणी झाल्यावर त्यांचा मोठा

मुलगा अतुल याला त्यांनीं मोटारींत आमच्या बरोबर दिलें, आणि दुपारीं बारा-साडेबारापर्यंत आम्हांला सिंगापुरांत फिरवून जेवायला घरीं घेऊन यावयाला सांगितलें. दोन दिवसांत सिंगापुरांत जास्तींत जास्त काय पाहातां येईल त्याचा कार्यक्रम माझ्यासाठीं सोनाळकरांनीं ठरवून टाकला होता; आणि त्यांना सकाळीं ऑफिसांत पोहोंचवल्यानंतर मोटार रात्रीपर्यंत आम्हांलाच देऊन टाकलेली होती. पहिल्याच भेटींत आपलासा करून टाकणाऱ्या सज्जन आणि सुस्वभावी माणसांपैकीं सोनाळकर हे एक आहेत.

मुंबईचा जसा मोठमोठ्या इमारती, कोर्ट, कचेऱ्या असलेला फोर्ट विभाग तसाच सिंगापुराचा ‘ रॅफल्स प्लेस ’ हा भाग. मात्र मुंबईतल्या फोर्ट विभागा-इतका हा मोठा नाहीं. मुंबईच्या प्रख्यात ‘ व्हाइट वे लेड लॉ या स्टोअर्सची तशीच दिसणारी शाखा इथें दिसली. सोनाळकरांच्या बँकेसमोरच कम्युनिस्ट चीनची अठरा मजली ‘ बॅंक ऑफ चायना ’ इमारत बांधली जात आहे. सिंगापूर ब्रिटिश साम्राज्यांत असलें तरी त्याला मर्यादित अधिकारांचें विधिमंडळ आहे. विधिमंडळाची पांढरी शुभ्र इमारत भव्य आहे. पांढऱ्या दगडाच्या बैठकीवर काळ्याकुळकुळीत दगडाचा कोरीव हत्ती इथें पाहिला. ‘ सिंह ’-पुरांत हा हत्ती कशाला ? हायकोर्टाच्या इमारतींत फिरतांना पब्लिक गॅलरींत बसून एखादा खटला थोडा वेळ पाहावा असा विचार केला; पण न्यायाधीश यावयाला बराच वेळ आहे असें कळलें तेव्हां बाहेर आलों.

## *मुंबई हवी—सिंगापूर नको !*

सिंगापुरांतले मोठमोठे रस्ते मुंबईतल्यासारखेच, पण अधिक स्वच्छ, चकचकीत वाटतात. त्याचप्रमाणें मोकळ्या जागा आणि झाडेंझुडपें हिरवींगार दिसतात. मोठमोठ्या अद्यावत् इमारती, स्वच्छ रुंद रस्ते आणि जिकडेतिकडे हिरवीं गार झाडेंझुडपें, हिरवळ यांमुळें थंड युरोपियन देशांतल्या शहरासारखें सिंगापूर दिसतें. हिरवें गार, पण हवा मात्र रखरखीत उष्ण आणि मुंबई-पेक्षां दमट, घामाच्या धारा वाहायला लावणारी. युरोपियनांनीं युरोपचें बाकी सर्व इथें आणलें; फक्त हवा आणूं शकले नाहींत. रस्ते स्वच्छ, चकचकीत, धुळीचा कणहि नसलेले, याचें कारण सिंगापुरांत बारा महिने बहुधा दररोज दुपारीं तीन-चारच्या सुमाराला जोराचा पाऊस पडून जातो. जवळजवळ विषुव-

वृत्तावरच सिंगापूर असल्यामुळें—इथें म्हणे बारा महिने एकच ऋतु असतो. पहांटेपासून कडकडीत, स्वच्छ सोनेरी ऊन, संध्याकाळीं जोराचा पाऊस, पुन्हां थोडा वेळ ऊन आणि रात्र. हवेखेरीज बाकी सर्व युरोपसारखें वाटायचें आणखी एक कारण म्हणजे रस्त्यावर मला कुठें कुत्रीं, घोडे, बैल किंवा बैलगाड्या दिसल्या नाहींत. मुंबईप्रमाणेंच रस्त्यावरल्या मोटारींच्या वाहतुकीचें नियंत्रण करण्याकरितां इथेंहि आपोआप विझणाऱ्या, पेटणाऱ्या हिरव्या व लाल दिव्यांचे खांब आहेत; पण विशेष म्हणजे कांहीं रस्त्यांवर पायीं जाणाऱ्या लोकांसाठीं कडेला एक बटन दाबायची सोय आहे. मोटारींची किंवा बस गाड्यांची फार वेळ सारखी रांग लागली आणि रस्ता ओलांडणें कठिण झालें तर कुणींहि बटन दाबावें म्हणजे लाल दिवा लागतो, आणि वहींतूक थांबते. मिनिट दीड मिनिटानें तो दिवा आपोआप विझत असावा.

मोठ्या रस्त्यावरून आंत गेल्यानंतर मुंबईंतील हमाम स्ट्रीट, दलाल स्ट्रीट-सारख्या छोट्या गल्ल्या, बोळ दिसू लागले. आमच्या फोर्टमधल्या गल्ल्यांत सुटांतले किंवा शर्ट-पॅन्टमधले काळेसावळे हिंदी लोक दिसतात, तर इथें तशाच कपड्यांतले पिवळे-गोरे चिनी लोक घाईघाईनें आपल्या कामधंद्यासाठीं जात असलेले दिसले. हिदु किंवा मुसलमान फेरीवाल्यांऐवजीं चिनी फेरीवाले हातगाड्यांवरून किंवा लाकडी खोपटांत लिंबांचा रस, संत्र्यांचा रस किंवा उसाचा रस विकीत होते. शहराच्या आंत आंत गेलों तेव्हां कांहीं गल्ल्या तर नळबाजारांतल्या गल्ल्यांसारख्या वाटल्या. तशीच घाण, तशीच गर्दी, मात्र चिनी स्त्रीपुरुषांची. मुंबई हें जसें बेट आणि महाराष्ट्राचें, तसेंच सिंगापूर बेट आणि मलायाचें. पण सिंगापुराच्या अकरा लाख लोकांतले मूठभर ब्रिटिश अधिकारी आणि व्यापारी सोडले तर साडेआठ लाख चिनी आहेत. मलायी फक्त अडीच लाख. सकाळीं बोटींतून उतरल्यापासून आतां दुपार होईपर्यंत सोनाळकरांच्या बँकेंत पाहिलेल्या मलायी शिपायांखेरीज मला तरी रस्त्यांत, दुकानांत किंवा बागेंत कुणी मलायी स्त्री किंवा पुरुष दिसला नाहीं. फेरीवाले चिनी, कापडदुकानांत चिनी, हॉटेलांत चिनी, बागेंत चिनी. माहीत नसतें तर आपण चिनी शहरांतच आहोंत असें वाटलें असतें! सबंध मलायाच्या पन्नाससाठ लाख लोकांत चाळीस टक्के चिनी, पंधरा टक्केच हिंदी आणि पंचेचाळीस टक्केच मलायी आहेत म्हणे. त्यामुळें मुंबई-महाराष्ट्राच्या उलट

सिंगापूर-मलायाचें त्रांगडें आहे. मुंबईसाठीं महाराष्ट्र जीव टाकतो, तर सिंगापूर घ्या घ्या म्हणणारांना मलायी पुढारी 'नको, नको, मुळींच नको,' म्हणत आहेत. सिंगापूरचे साडे आठ लाख चिनी आणखी मलायांत मिळाले तर आपण अगदींच अल्पसंख्याक होऊं अशी भीति मलायी लोकांना वाटते !

## *ताक विरुद्ध कोकाकोला !*

लहान लहान रस्त्यांवरून जातांना चिनी लोकांच्या कपडे वाळत घालण्याच्या पद्धतीची मोठी गंमत वाटली. सबंध रस्त्यांत वरच्या मजल्यावरच्या रहिवाशांनीं, आम्ही येणार म्हणून आमच्या स्वागतासाठीं दोन्ही बाजूंना आपापल्या खिडक्यांतून गुढ्या, तोरणें उभारलीं आहेत कीं काय असें मला वाटलें. मात्र या गुढ्या पितांबरांच्या किंवा जरीच्या कापडाच्या नसून जुनाट पोलकीं, चड्ड्या, झगे, पायजम्यांच्या होत्या ! खिडकींतून लांब दांड्या बाहेर काढून बांधून ठेवायच्या आणि त्यांच्यावर कपडे वाळत घालायचे, अशी गोरगरीब मध्यमवर्गीय सिंगापुरांतल्या चिन्यांची पद्धत दिसते. चिनी मोठे डोक्याचे खरे. सिंगापुरांत रोज संध्याकाळी पाऊस येतो; तेव्हां पाऊस आला रे आला कीं एकदम दांडी आंत ओढून घेतां येते. प्रथमच पाहाणाराला रस्त्यावरलें तें दृश्य मात्र कसेंसेंच दिसतें.

दुपारचे बारा-साडेबारा वाजले तसे सोनाळकरांना त्यांच्या ऑफिसांतून घेऊन गुडमन् रोडवरील त्यांच्या 'युकोहाऊस' बंगल्याकडे जेवायला जायला आम्ही निघालों. वाटेंत सिंगापुराचा कलांग विमानतळ लागला. विशेष गंमतीची गोष्ट म्हणजे एक विमान तळावर उतरत होतें; त्यामुळें रेल्वेलाईन ओलांडतांना केव्हां केव्हां फाटक बंद असल्यामुळें जसें थांबावें लागतें त्याप्रमाणें रस्त्यावरलें फाटक बंद असल्यामुळें आमच्या मोटारीला थांबावें लागलें ! मोटारचा रस्ता विमानतळाच्या मधून जातो.

आज रात्रीं सिंगापुरांत बॅडमिन्टनचे आंतरराष्ट्रीय सामने आहेत. नंदू नाटेकर, रवीन्द्र डोंगरे, हेमाडी, मनोज गुहा, त्रिलोक शेट वगैरे भारतीय खेळाडूंचा संघ त्याकरितां मुद्दाम इथें आला आहे आणि अमेरिकन संघाशीं आज रात्रींच त्यांचे सिंगल्स, डबल्स सामने आहेत. आमचे मराठे गडी— नाटेकर, डोंगरे ताक न मिळाल्यामुळें बेचैन आहेत. तेव्हां सोनाळकरांचा

मुलगा रेफ्रिजरेटरमधलें ताक एका मोठ्या थर्मासमध्यें घेऊन त्यांच्या हॉटेलकडे जायला निघाला. जेवायला थोडा वेळ होता, तेव्हां आम्हीहि त्यांच्याबरोबर मोटारींतून बाहेर पडलों. इथल्या सुप्रसिद्ध 'ओशन पार्क' हॉटेलमध्यें हे खेळाडू उतरले आहेत. आम्ही तिथें पोहोचलों तेव्हां त्यांच्यापैकीं कुणीच हॉटेलांत नव्हता. हॉटेलच्या हिरवळीवरून समोर पाहतां दूर अंतरावर निळसर डोंगर, हिरवी गार झाडी आणि फिकट हिरवा समुद्र असें चित्रांतल्यासारखें दृश्य दिसतें. हॉटेलच्या नोकराजवळ ताकाचें भांडें देऊन आम्ही परतलों. पाहूं या आज रात्रीं 'कोकाकोला' वर 'ताक' मात करतें का!

## *पान कीं फूल ?*

मलायाचीं दाट जंगलें फार विख्यात आहेत. अतिशय उष्ण हवा आणि बारा महिने पाऊस त्यामुळें इथल्या जंगलांतल्या झाडांची भलतीच वाढ होते. इथल्या जंगलांतलीं झाडें प्रचंड, पानें प्रचंड, प्राणीहि प्रचंड—ताडामाडासारखे लांबरुंद अजगर, हात हात लांब सरडे इथें दिसतात म्हणे. या जंगलांचा थोडासा नमुना पाहावा म्हणून जेवण आटोपल्यावर सिंगापुरांतल्या 'बोटॅनिकल गार्डन्स' पाहायला बाहेर पडलों. मुंबईच्या राणीच्या बागेसारखीच ही बाग खूप मोठी आहे. निरनिराळ्या प्रकारचीं मोठमोठीं झाडें इथें आहेत, पण फुलें आणि पांखरें फारशीं दिसत नाहींत. पिनांगमध्यें पाहिलें होतें तसलें सुरूसारखें उंच आणि मधल्या सोटाला परकर नेसवावा अशी मोठमोठ्या पानांची परडी असलेलें चमत्कारिक झाड इथेंहि होतें. त्याचें इंग्रजी नांव 'स्टॅगहॉर्न फर्न' म्हणजे सांबरशिंगी नेचा असें दिलें होतें. त्या परडीसारख्या दिसणाऱ्या मधल्या भागाचीं पानें खरोखरच सांबरशिंगाच्या आकाराची आठवण करून देत होती. झाडाच्या शेंड्याकडलीं पानें गळून या परडींत पडतात आणि त्यांच्यांतला रस शोषून या परडींतून खालीं झिळमिळ्यांसारखीं लोंबणारीं हीं सांबरशिंगी पानें जगतात, असें कळलें. आणखी एक मजेदार झाड पाहिलें. याचीं पानें मोठ्या थोरल्या अळूच्या पानांसारखीं हिरवींगार रुंद होतीं. पांचदहा पानांत एखादें पान गुलाबी किंवा पांढऱ्या रंगाचें, आणि त्याच्या मध्यांतून विष्णूच्या नाभींतून कमळाचा देठ फुटावा त्याप्रमाणें एक तांबडेंलाल बोटासारखें बोंड वर आलेलें. हें बोंड फुटलेलें निराळ्या रंगाचें

पान या झाडाचें फूल असावें ! याचनेला कुणींतरी हात पुढें करावा आणि त्या हाताच्या तळव्यांतून लाल किंवा गुलाबी मेणबत्ती वर आलेली असावी असें कांहीं तरी हें फूल पाहिल्यावर वाटतें. युरोपियनांचें,—विशेषत: अमेरिकनांचें 'ऑर्किड' हें फार आवडतें फूल आहे. निरनिराळ्या रंगांचीं 'ऑर्किड' फुलें असतात. या चमत्कारिक आकाराच्या फुलाला माथेरान-महाबळेश्वरांतले माळी 'विंचूचें फूल' म्हणतात. तसाच कांहींतरी त्याच्या पाकळ्यांचा वेडावांकडा पण सुंदर आकार असतो. इथें पाहिलेलीं मलायी 'आर्किड' फुलें खूपच मोठीं आणि जांभळट, गुलाबी रंगाचीं होतीं.

## *जावा सुमात्रांत अर्जुन-सुभद्रा*

'बोटॅनिकल गार्डन्स' मधून इथलें 'रॅफल्स् म्यूझियम' हें वस्तुसंग्रहालय पाहायला गेलों. जावा सुमात्रा, मलाया या भागांतले बहुतेक सर्व लोक आज मुसलमान धर्माचे असले तरी हजार बाराशें वर्षांपूर्वी इथें हिंदु सम्राटांचें अधिराज्य होतें. जनतेचा धर्म हिंदु होता. जावाजवळच्या बालीबेटांत तर अजूनहि हिंदु आहेत. इथल्या ऐतिहासिक अवशेषांत हिंदु संस्कृतीची छाप आढळतेच, पण आजच्या मलायी भाषेंत , स्त्रीपुरुषांच्या नांवांत, कथानाटकांतहि ती आढळते. जावा-सुमात्रांत कातरलेल्या चित्रांवर प्रकाश पाडून पडद्यावर दाखवण्यांत येणारें 'छाया नाट्य' फार लोकप्रिय आहे. या नाट्यांतलीं व्यंगचित्रांसारखी दिसणारीं चित्रें आणि कांही मुखवटे एका कांचेच्या कपाटांत होते. या लाल, सोनेरी, काळ्या, पिवळ्या मुखवट्यांखालीं सुग्रीव, घटोत्कच, जनक, कुंभकर्ण, वृकोदर अशीं नांवें होतीं. मात्र जनक हा शब्द डच स्पेलिंगाप्रमाणें 'Djanoko' असा लिहिला होता. या 'छाया नाट्यां' च्या कथा अजूनहि महाभारत-रामायणांतल्याच असतात. छाया नाट्यासाठीं वापरल्या जाणाऱ्या असल्याच चित्रांचा एक संच इंडोनेशियाचे अध्यक्ष डॉ. सुकर्ण यांनीं पंडित जवाहरलालांना नजर केल्याचें कांहीं दिवसांपूर्वीं वृत्तपत्रांत वाचलें होतें.

एका दालनांत मलायांतल्या सुलतानांच्या दरबारांतल्या भरजरी गाद्या, तक्के, लोड होते. त्यांना 'बंतल सराया' म्हणतात. बोर्निओ विभागांत सुरेख रंगीत कशिदा काढलेलें झाडाच्या सालीचें कापड होतें. एकीकडे बालीबेटावरल्या 'अर्जुनविवाह' नाटकांत वापरायचे भयंकर दिसणारे रंगीबेरंगी

मुखवटे दिसले. १९१० सालीं सुमात्रांत सांपडलेला तेवीस फूट लांबीचा अजगर भुसा भरून एके ठिकाणीं ठेवला होता. दुसरीकडे खेळांतल्या होडीसारखी एक छोटीशी रंगीत होडी होती. खेड्यांत कसली साथ आली म्हणजे मलायी खेडूत ही होडी समुद्रांत सोडून देतात. तिच्यांतून सर्व इडापिडा जाते म्हणतात. तिथें नांव लिहिलें होतें, 'कपालहान्तू'. वस्तुसंग्रहालयाच्या इमारतीचा जिना चढून वर गेल्यावर पहिल्या मजल्याच्या प्रवेशद्वाराशींच एक छोटासा काळ्या रंगाचा अर्धपुतळा आहे. जावा बेटावरल्या पौराणिक गोष्टींतल्या अर्जुनाचा तो पुतळा आहे. त्याच्या समोरच कुणातरी चिनी नटाचा असाच एक अर्धपुतळा दिसला.

या सिंगापुरांत तीन-चतुर्थांशांपेक्षां अधिक लोक चिनी आहेत; पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे या वस्तुसंग्रहालयांत ऐतिहासिक, सांस्कृतिक अवशेष पाहायला आलेल्या शेकडों स्त्रीपुरुषांत मला एकहि चिनी पुरुष किंवा स्त्री दिसली नाहीं. मुलांबाळांसह तिथें आलेले सर्व स्त्रीपुरुष मलायी होते. बारीक डोळ्यांचे बसकट चेहेऱ्यांचे मलायी पुरुष काळ्या किंवा हिरव्या मखमलीच्या वर दुमडलेल्या 'सुकर्ण' छाप टोप्या डोक्यावर, गुलाबी रंगाचा रेशमी सदरा आणि पायजमा, पायजम्यावर पंचासारखा रंगीबेरंगी रेशमी 'सेरॉंग' कमरेला बांधलेला अशा थाटांत; तर मलायी बायका रंगीबेरंगी रेशमी सदरा आणि पायजम्यांत होत्या.

## सुभाषबाबूंचें स्मारक

परत येतांना समुद्राजवळच्या क्लिफर्ड पियर, एलिझाबेथ, वॉक्, अँडर्सन ब्रिज या भागांतून आम्ही आलों. समुद्रकांठीं एका टोंकाला एक चिनी पद्धतीचा—देवळासमोरच्या दीपमाळेसारखा दिसणारा स्मारकस्तंभ दिसला. या ठिकाणीं सुभाषबाबूंचें स्मारक होतें म्हणतात. ब्रिटिशांनीं जपान्यांकडून पुन्हा सिंगापूर घेतल्यानंतर तें स्मारक काढून टाकून त्यांना या लढाईत साहाय्य करणाऱ्या कुणातरी चिनी इसमाचें हें स्मारक त्यांनीं उभें केलें.

सोनाळकरांनीं रात्रीच्या बॅडमिन्टन सामन्याचीं आमच्यासाठीं तिकिटें घेऊन ठेवलीं होतीं. आंतरराष्ट्रीय 'टॉमस कप्' साठीं हे सामने होते. सिंगापूर बॅडमिन्टन हॉलमध्यें हे सामने पाहायला आम्ही सोनाळकरांबरोबर गेलों.

ब्रेबर्न स्टेडियममारखीच बसायची व्यवस्था होती. पण जागा सर्व बाजूंनीं बंद आणि खेळांतले 'शटल, कॉक्' किंवा फूल उडूं नये म्हणून पंखेहि बंद; त्यामुळें आंत मनस्वी उकडत होतें. ज्यांच्या नांवें हा कप आहे ते सर टॉमस सामना पाहावयाला आले होते. हॉलमध्यें चिनी आणि हिंदी लोकांचीच गर्दी दिसत होती. पहिलाच सामना अमेरिका विरुद्ध भारत असा होता. दोन्ही राष्ट्रांचीं राष्ट्रगीतें बॅण्डवर वाजवण्यांत आलीं, आणि सिंगल्स सामना सुरू झाला. प्रेक्षकांचा उत्साह उतू जात होता. नंदू नाटेकराच्या प्रत्येक फटक्याला टाळ्यांचा गजर होत होता. अमेरिकन खेळाडूचा पराभव करून नंदू नाटेकर विजयी झाला. ताकानें कोकाकोलावर मात केली !

२५ मे १९५५

*टायगर बाम गार्डन्स*

आपल्याकडे ज्याप्रमाणें 'अमृतांजन' हें नांव सर्वतोमुखीं झालेलें आहे, त्याचप्रमाणें सिंगापूर आणि मलायांत 'टायगर बाम' झालें आहे. या 'टायगर बाम' चे मालक असलेले दोघे चिनी भाऊ 'आँ बून हॉ' आणि 'आँ बून पार' हें औषध विकून कोटयाधीश झाले आहेत. त्यांची आई ब्रह्मी आणि वडील चिनी. 'चाळीस वर्षांपूर्वी सायकलवरून औषधें विकीत सिंगापूरच्या रस्त्या-वरून ते फिरत' असें कळलें. त्यानंतर 'टायगर बाम' चा कारखाना त्यांनीं काढला. आणि आज त्यांच्या कारखान्यांत बाराशें स्त्रिया काम करतात. सिंगापुरांतलें एक प्रख्यात इंग्रजी दैनिक आज त्यांच्या मालकीचें आहे. या भावांनीं आपलें स्मारक म्हणून म्हणा किंवा गंमत म्हणून म्हणा, 'हॉं पार व्हिला' किंवा 'टायगर बाम गार्डन्स' नांवाची राणीच्या बागेसारखी एक प्रचंड बाग केली आहे. बागेंत जिवंत प्राणी नाहींत, सिमेन्टचे रंगीबेरंगी, चित्रविचित्र अजस्र प्राणी आहेत. सकाळीं १० वाजतां बोटीवरून बाहेर पडलों, आणि सोनाळकरांच्या मोटारींतून ही बाग पाहावयाला गेलों. या बागेंत जें पाहिलें तें खरोखरच स्वप्नांत-नव्हे दुःस्वप्नांत पाहिल्यासारखें वाटलें. रात्रीच्या वेळीं कांहींतरी अबॅटचबॅट पोट फुगेपर्यंत खाल्ल्यानंतर झोपेंत केव्हां केव्हां भयंकर स्वप्नें पडतात आणि जागें झाल्यावरसुद्धां आपली छाती धाडधाड उडत असते. 'टायगर बाम गार्डन्स' म्हणजे रंगीबेरंगी सिमेन्टचें एक जिवन्त

दुःस्वप्न आहे. चिनी पुराणांतले, दंतकथांतले, प्राचीन वाङ्मयांतले भयंकर प्राणी, — मासे, खेकडे, अजगर, कासव, शहामृग, राक्षस, राक्षशिणी सर्व कांहीं इथें आहे. 'रक्तकमलमंदिराची जाळपोळ' या नांवाची एक प्राचीन चिनी कथा आहे म्हणे. त्या कथेंत मठांतल्या भिक्षूंनीं पुष्कळसे स्त्रीपुरुष ठार केल्याचें वर्णन आहे. त्या भिक्षूंना नंतर समुद्राच्या शंखांतून बाहेर आलेल्या जलपऱ्या मारून टाकतात. हा कथाभाग एके ठिकाणीं लाल, पिवळ्या, काळ्या, हिरव्या सिमेन्टांत दाखविला आहे. एके ठिकाणीं नाकातोंडांतून अग्निज्वाला बाहेर टाकणारे राक्षस आहेत, तर दुसरीकडे मेंढ्याच्या गळ्यांत सर्प लोंबत आहे आणि त्याला पाहात वाघ उभा आहे. कुठें कांसवाएवढे मोठे गुलाबी खेकडे, लाल, हिरवे, काळे शिवंड मासे, काळे सील, पांढरें अस्वल अकारण एकमेकांजवळ आहेत, तर कुठें शहामृगांच्या पाठीवर एक प्रचंड कांसव वर मान करून ऐटींत बसला आहे. एके ठिकाणी एक मोठ्ठी थोरली डुकरीण आडवी पडली आहे. तिचे अनेक स्तन माकड, जिराफ, हरिण वगैरे प्राणी पीत आहेत, आणि तिचीं पिलें आशाळभूतपणें पाहात आहेत ! हिरव्या, लाल, पिवळ्या रंगाच्या सिमेंटच्या एका पुष्करिणींत एका बाजूला एक प्रचंड बेडूक दुसऱ्या बेडकाला तोंडांत धरून गिळण्याचा प्रयत्न करीत असलेला दिसतो, तर दुसऱ्या बाजूला एक हिरवा साप दुसऱ्या सापाला मटकावीत आहे. आजूबाजूंला उंदीर बसले आहेत. या पुष्करिणीमध्यें दीपमाळेमारखा एक स्तंभ आहे, आणि त्या स्तंभावर बुद्धाची मूर्ति आहे. एके ठिकाणीं एक चिनी तरुणी एक म्हातारीला आपला स्तन देत आहे, आणि तिचीं मुलें तिच्या पुढ्यांत उभीं आहेत ! या सर्व अद्‌भुत कथेंतल्या पसाऱ्यांत अधूनमधून चांफ्याचीं, कण्हेरीची, गुल्मोहोराचीं ओळखीचीं झाडें,— सिमेंटाचीं नव्हे खरीखुरीं,—दिसत तेव्हां जरा हायसें वाटे.

## *सिंगापुरांत भय्या !*

ही बाग पाहून पासार पंजांग जालन रस्त्यानें परत जात असतां डोक्यावरून एक रुपेरी रंगाचा पूल आडवा गेलेला दिसला. हा पूल नव्हता. 'टायगर बाम' च्या मालकांचाच नांगर छाप बिअरचा प्रचंड पांढऱ्या रंगाचा कारखाना रस्त्याच्या एका बाजूला आहे. इथें तयार झालेली बिअर रस्त्याच्या

दुसऱ्या बाजूला असलेल्या इमारतींत बाटल्यांत भरण्याकरितां ज्या अजस्र पांढऱ्या नळांतून पलीकडे जाते ते नळ आम्हांला पुलासारखे वाटले होते! सिंगापूरच्या श्रीमंत लोकांचे बंगले या टँगलिंग भागांत आहेत. 'टायगर बाम गार्डन्स' चे एक मालक ऑ बून हॉ यांचा एक बंगला इथें आहे. या बंगल्यांत मौल्यवान 'जेड' दगडाच्या वस्तूंचा फार मोठा संग्रह त्यांच्या खासगी मालकीचा आहे.परवानगी घेऊन तो कुणालाहि पाहतां येतो. जातां जातां तो पाहाण्याचें ठरवून आम्ही बंगल्याच्या आवारांत गेलों. बागेंतल्या रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पांढऱ्या दगडाच्या बुद्धाच्या मूर्ती होत्या. प्रवेशद्वाराशीं लांबलचक सोटा हातीं असलेला एक धिप्पाड भय्या उभा होता. आम्हांला आंत जायचें आहे, तेव्हां परवानगी कुठें घ्यायची म्हणून आम्हीं त्याला विचारलें, तेव्हां आमचें रंगरूप न्याहाळीत तो उत्तम हिंदीत हंसत हंसत म्हणाला, 'साहेब, तुम्ही तर माझ्या देशांतले, तुम्हांला कसली परवानगी? मी आहें ना तुम्हांला आंत न्यायला! मी उत्तर हिंदुस्थानांतल्या गोरखपूरचा आहे, साहेब. चला आंत." हिंदुस्थानांतले लोक दिसल्यामुळें त्याला फार आनंद झालेला दिसला. बागेंत व बंगल्यांत पूर्ण शांतता होती, पण चिनी संगीताचे मंद स्वर कुठल्या तरी रेडिओवरून येत होते.

'इथं कुणी राहातं कीं काय?' आम्हीं त्या भय्याला विचारलें.

'हो, आमच्या जुन्या धन्याच्या चार बायकांपैकीं एक इथें राहाते,' तो म्हणाला, 'दुसरी हाँगकाँगमध्यें राहाते. आमचे धनी ऑ बून हॉ साहेब अडुसष्ट वर्षांचे होऊन चारपांच वर्षांपूर्वींच वारले. त्यांचे बंधु ऑ बून पार साहेबहि वारले.'

'त्यांचे मुलगे मुली असतीलच!' आम्हीं विचारलें.

'आहेत ना!' तो म्हणाला, 'पण ते मजा करताहेत. आज सिंगापुरांत तर उद्यां हाँगकाँगला, परवां रंगूनला नाहीतर जाकार्ताला असे ते फिरत असतात.'

तो बोलत असतां मी बागेंतल्या फुलझाडांकडे पाहात होतों. हिरवळीवर कुठें कुठें मला हरणें दिसलीं. तीं मातीचीं होतीं. खऱ्या प्राण्यापेक्षां मातीचे किंवा सिमेन्टचे प्राणी करून ते बागेंत ठेवण्याचा या चिनी लोकांना षोक दिसतो!

## जेड दगडाच्या कलाकृति

ऑ बून हॉची विधवा बंगल्यांतल्या एका भागांत राहात असली तरी जेडच्या वस्तु असलेला बंगल्याचा भाग लोकांकरितां खुला आहे. जेडच्या वस्तूंप्रमाणेंच साऱ्या जगांत विख्यात असलेलीं कित्येक शतकांपूर्वीची इतिहासकालांतली नक्षीकाम केलेलीं प्रचंड चिनी भांडींहि या बंगल्यांत आहेत. चिंग अमदानींतलीं हीं भांडीं उत्कृष्ट कलाकृति म्हणून कलासृष्टींत ओळखलीं जातात, आणि युरोप-अमेरिकेंतले षोकी श्रीमंत हजारो रुपये ओतून असलें एक एक भांडें खरेदी करतात. प्रवेशद्वाराशींच असलेलीं असलीं दोन भांडीं जवळजवळ माझ्याइतकीं उंच होतीं ! लख्ख कांचांच्या कपाटांत ठेवलेल्या जेडच्या वस्तू एकाहून एक सुंदर होत्या. त्यांना पाहून 'टायगर गार्डन्स' मधल्या भयंकर आकृति ठेवण्याचे शंभर गुन्हे ऑ बून बंधूंना एकदम माफ करून टाकावेसें वाटलें ! लालसर, गुलाबी, हिरवट, काळसर, मांजरांच्या डोळ्यांमारख्या अनेक छटांच्या जेड दगडाच्या लहानमोठ्या मूर्ती, पेट्या, पक्षी, प्राणी तिथें होते. ताजमहालमध्यें कबरेभोंवतीं संगमरवरी दगडाच्या जाळ्या आहेत, तशा सुंदर कोरीव कामाच्या जेड दगडाच्या जाळ्याहि इथें दिसल्या. एका कपाटावर सोन्याची बुद्धाची मूर्ति होती आणि तिच्या दोन्ही बाजूंना सोन्याचें काम केलेलीं दोन चिनी भांडीं होतीं. काळ्या कुळकुळीत शिसवी लाकडाच्या ठोकळ्यांत बसवलेले दोन मोठे थोरले हत्तीचे दांत एका कोपऱ्यांत होते. गोरखपुरी भय्यानें मोठ्या अभिमानानें आम्हांला सांगितलें, 'साहेब, हे हस्तिदंत आपल्या हिंदुस्थानांतल्या हत्तींचे. आमच्या यू. पी. तून मालकांनीं इथें आणले ! '

पांढरट गुलाबी अलाबास्टर दगडाचा ग्रीक स्त्रीचा एक अतिशय सुंदर पुतळा एका खोलींत होता, तर दुसऱ्या एका खोलींत तांबड्या रंगाची एक रेशमी गादी आणि जरतारी काम केलेल्या तांबड्या गाद्यांच्या दोन खुर्च्या होत्या. या खोलींत ऑ बून हॉचा एक भव्य फोटो भिंतीवर होता, आणि त्याच्यासमोर भस्म भरलेल्या चिनी भांड्यांत बुद्धमंदिरांत दिसणाऱ्या बोटाएवढ्या जाड उदबत्त्या जळत होत्या.

आमच्या गोरखपुरी मित्राला धन्यवाद देऊन बोटीवर दुपारचें जेवण घेण्याकरितां आम्ही परतलों.

## *तुआन, इंचे, उंगकू, टेंगकू*

संध्याकाळीं मलायाचे एक प्रमुख विचारवंत आणि सिंगापुरांतील मलाया विद्यापीठाचे अर्थशास्त्रज्ञ उंगकू अब्दुल अझीझ यांना भेटायला जायचें होतें. माझे मित्र श्री. प्रभाकर पाध्ये हे सिंगापुरांत पूर्वीच येऊन गेलेले होते. उंगकू अझीझना भेटल्याशिवाय राहूं नका असें त्यांनीं मला बजावून सांगितलें होतें. त्यांच्यासाठीं पाध्यांनीं मला एक पत्रहि दिलें होतें. सोनाळकरांनीं टेलिफोन करून आम्ही संध्याकाळी त्यांना भेटायला येणार असल्याचें कळविलेंच होतें. सिंगापूरच्या दूर एका टोंकाला मुंबईतल्या खंबाला हिल-मलबार हिलसारख्या रम्य डोंगराळ भागांत 'युनिव्हर्सिटी ऑफ मलाया' आहे. संध्याकाळीं सहाला आम्ही बाहेर पडलों. या बाजूला जातांना सुखवस्तु लोक राहात असलेल्या एकाहून एक सुरेख इमारती वाटेंत दिसत होत्या. अँग्लो-चायनीज् हायस्कूलची इमारत तर आमच्या इथल्या विद्यापीठाच्या इमारतीपेक्षां भव्य वाटली. हायस्कूलला केवढें तरी प्रशस्त पटांगण आणि उंच घड्याळघर किंवा क्लॉक-टॉवर आहे. सिंगापुरांतल्या चिन्यांचीं एकाहून एक मोठीं हायस्कुलें आहेत म्हणतात. इथली राहणी महागाईची आहे, पण पगारहि तसेच आहेत. याच अँग्लो-चायनीज् हायस्कुलांत श्री. प्रधान हे एक आपले महाराष्ट्रीय गेलीं कित्येक वर्षें भूगोल वगैरे विषयांचे शिक्षक आहेत. त्यांचा महिन्याचा पगार बाराशें मलायी डॉलर म्हणजे जवळ जवळ अठराशें रुपये आहे! सिंगापुरांत त्यांचें स्वतःचें घर आणि मोटरहि आहे. गेल्या महायुद्धांत जपान्यांनीं सिंगापूर घेतलें तेव्हां प्रधान तिथेंच होते. ब्रिटिश कैद्यांच्या कॅम्पचे प्रमुख किंवा असेंच कांहीं तरी काम जपान्यांनीं त्यांना त्या वेळीं दिलें होतें.

जोहोर-बारू रोडवर युनिव्हर्सिटीच्या आसपास प्राध्यापकांसाठीं छोटे छोटे सुंदर बंगले आहेत. डोंगराळ भागांतल्या वर खालीं जाणाऱ्या रस्त्यावरील उंगकू अझीझ यांचा बंगला सांपडायला आम्हांला बराच वेळ लागला. ते आमची वाटच पाहात होते. त्यांना पाहून मी चकित झालों. ते मलायी मुळींच दिसत नाहींत. तांबूस सोनेरी केस आणि दाढी असलेले, गोरे पान उंगकू पांढरा सदरा

आणि पायजमा घातलेल्या एखाद्या युरोपियनासारखे दिसत होते. मलायी आपल्या गुरख्यांसारखे बारीक डोळ्यांचे आणि निमगोरे किंवा काळसर असतात. पस्तिशीच्या आसपास असलेले उंगकू अब्दुल अझीझ एखाद्या इंग्रजासारखे दिसत होते, आणि इंग्रजीहि अतिशय सफाईदार बोलत होते. या गोष्टीचें अर्थात् आश्चर्य वाटावयाचें कांहींच कारण नाहीं. उंगकू ही उपाधि मलायाच्या राजघराण्यांतल्या पुरुषांनाच लावतात. मलायांतल्या नऊ राज्यांचे नऊ सुलतान आहेत. सिंगापुराला लागून असलेल्या जोहोर संस्थानाच्या सुलतानाच्या घराण्यांतील उंगकू अब्दुल अझीझ आहेत. त्यांचे वडील सुलतानांच्या दूरच्या चुलत भावांपैकीं. त्यांनीं युरोपियन स्त्रीशीं लग्न केलें. अझीझ युरोपियनांसारखे दिसतात याचें कारण त्यांची आई युरोपियनच होती. त्यांची पत्नीहि गौरकांतीची, आणि झेबुन्निसा किंवा नूरजहान यांची इतिहासांत आपण वर्णनें वाचतों तशा प्रकारचें अक्षरश: लावण्य असलेली आहे. त्यांची आठदहा वर्षांची छोटी मुलगी अख्तर तर एखाद्या युरोपियन मुलीसारखीच दिसते. त्यांच्या पत्नीचे वडील तुर्कस्थानांतले. त्यांच्या मामूबाई,—त्यांच्या आत्या, एखाद्या वृद्ध बेगमासारख्या तिथें बसल्या होत्या. मलायी राजघराण्यांतल्या बायकांना बेगम म्हणतात की काय ठाऊक नाहीं, पण राजघराण्याशी प्रत्यक्ष संबंध असलेल्या पुरुषाला 'टेंगकू' उपाधि आहे. चुलतचुलत, दूरच्या नात्यांतले 'उंगकू', सरदार दरकदार 'इंचे' आणि कुणाहि सद्गृहस्थाला मलायींत 'तुआन्' म्हणतात.

## *सुलतान संस्कृत पंडित*

घरांतल्या मंडळीखेरीज अझीझ यांच्या एक सहकारिणी विद्यापीठांतल्या राज्यशास्त्राच्या प्राध्यापिका मिस् रोझेन्बर्ग याहि तिथें लांबोळ्या बिअर ग्लासमधून लिंबाचें सरबत पीत बसल्या होत्या. मलायाचे शिक्षणविषयक प्रश्न बरेचसे आमच्या इथल्यासारखेच आहेत. रोमन लिपींतून मलायी भाषा लिहावी कीं जुन्या अरबी लिपींतून लिहावी असा वाद चालू आहे. बरेचसे सुशिक्षित मलायी रोमन लिपीच्या बाजूचे आहेत; कारण इंग्रजी शिकलेले असल्यामुळें रोमन लिपी त्यांना जवळची वाटते. दुसरें असें कीं, मलायांत अजून चांगलेसे लेखक किंवा वाङ्मय नाहीं. मलायाला अगदीं जवळचा म्हणजे

नुकताच स्वतंत्र झालेला मलायी भाषाच बोलणारा इंडोनेशिया देश. इंडोनेशियानें रोमन लिपि स्वीकारली आहे. इंडोनेशियाच्या कवि, कादंबरीकारांचीं पुस्तकें रोमन लिपींत प्रसिद्ध होतात. सुशिक्षित मलायी हींच पुस्तकें वाचतात. भारतापेक्षांहि मलाया मागासलेला असला आणि अजूनहि ब्रिटिश साम्राज्याच्या मगरमिठींतून सुटलेला नसला तरी मलायांतलें साक्षरतेचें प्रमाण मात्र भारतांतल्यापेक्षां खूपच मोठें आहे. मलायांतले चाळीस टक्के लोक साक्षर आहेत. या साक्षरता प्रसाराचें उंगकू अझीझ यांनीं सांगितलेलें कारण फार मजेदार आहे. 'याचें कारण' ते म्हणाले, 'कुराण आणि वृत्तपत्रें!' 'तें कसें काय?' म्हणून मी विचारलें, तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें कीं, 'कुराण वाचतां आलें पाहिजे म्हणून आणखी कांहीं शिकायचें नसलें तरी अरबी लिपि शिकण्याचा पुष्कळ लोक प्रयत्न करतात. अर्थ समजो न समजो, पण त्यामुळें कुराणाची पोपटपंची तरी त्यांना खास करतां येते. लिपि समजते त्यामुळें खेडयापाडयांतले लोकसुद्धां हातीं पडतील तीं मलायी वृत्तपत्रें वाचून काढतात. कांही दिवसांपूर्वी खेडयापाडयांत फिरून मलायी शेतकऱ्यांच्या उत्पन्नाची नि कर्जबाजारीपणाची बरीचशी माहिती मीं गोळा केली तेव्हां ही वस्तुस्थिति माझ्या ध्यानांत आली. हे आंकडे गोळा करीत असतां साक्षरतेसंबंधींहि मी प्रश्न विचारीत असें.'

अझीझ यांचे वडील सुलतानाच्या कुळांतले, गर्भश्रीमंत असूनहि त्यांचा विद्याव्यासंग दांडगा होता. इसवी सनाच्या चौथ्या ते तेराव्या शतकापर्यंत जवळजवळ हजार वर्षे भारतांतले पांडय, पल्लवादि राजेच जावा, सुमात्रा, मलाया इत्यादि प्रदेशांवर राज्य करीत होते. नंतर अरबांच्या स्वाऱ्या होऊन हे देश मुसलमान झाले. त्यामुळें मलायी मुसलमान असूनहि मलायी भाषा आणि संस्कृति यांच्यावर संस्कृत भाषा आणि भारतीय संस्कृति यांची दाट छाया आहे. अझीझ यांच्या वडिलांचा संस्कृत भाषेचा अभ्यास इतका दांडगा होता कीं, अझीझ म्हणाले, 'त्यांनीं आपली दैनंदिनी संस्कृत भाषेंत ठेवली होती!'

## *हरिरायाचा प्रआसा*

हें सांगतां सांगतां अझीझ माडीवर गेले आणि वडिलांनीं मुद्दाम संग्रह करून

ठेवलेल्या कांहीं मूर्ती त्यांनीं खालीं आणल्या. त्यांत संगमरवरी दगडाच्या पाशअंकुशधारी अशा उजव्या सोंडेच्या दोन सुंदर गणेशमूर्ती होत्या. 'या मूर्ती पेपरवेट म्हणून माझ्या टेबलावर मी वापरतों,' अझीझ म्हणाले. खांद्यावर पोपट असलेली मदुरेच्या मीनाक्षीचीहि एक पितळेची सुंदर मूर्ति होती. त्या संग्रहांत अष्टभुजा देवीची मूर्ति पाहून आम्हांला आश्चर्य वाटलें. अझीझ यांनीं हिंदुस्थानांत ज्याला बंदी केली आहे तें ऑब्रे मेनन यांचें 'रामायण रीटोल्ड' हें पुस्तक वाचलें होतें. त्यांना गीता वाचायची फार इच्छा होती. 'गीतेचें अगदीं अलीकडचें आणि अत्यंत सुंदर इंग्रजी भाषांतर वाचायचें असेल तर सुप्रसिद्ध इंग्रजी लेखक आणि कवि ख्रिस्तॉफर इशरवुड याचें वाचा' असें मी त्यांना सांगितलें.

'तुमच्या मलाया विद्यापीठांत तुम्हीं संस्कृत विभाग उघडला पाहिजे.' चांदूरकर अझीझना म्हणाले.

'तें खरं आहे,' अझीझ म्हणाले, 'पण आमचें विद्यापीठ नवीनच आहे. तेव्हां आधीं इथं बोलल्या जाणाऱ्या मलायी, चिनी आणि तामीळ भाषांचे विभाग सुरू केले पाहिजेत. मलायीचा सुरू झालाच आहे.'

सिंगापुरांत तान्यांग नांवाचें विद्यापीठ निघावयाचें होतें आणि अमेरिकेंत स्थायिक झालेले प्रख्यात चिनी लेखक लिन् यू टांग हे त्या विद्यापीठाचे कुलगुरु म्हणून यायचे होते; पण सिंगापुरांत चिनी विद्यार्थ्यांचा भरणा फार आहे आणि त्यांच्यांत कम्युनिझमचें वारें जोरांत पसरलें आहे त्यामुळें लिन् यू टांग येत नाहींत, असें कुठें तरी मीं वाचलें होतें. 'असं कांहीं म्हणतां येत नाहीं.' अझीझ म्हणाले, 'तान्यांग विद्यापीठाजवळ पैसा भरपूर आहे, तें सुरू व्हायला पाहिजे; पण अजून सुरू झालेलें नाहीं एवढें मात्र खरें.'

'तुम्ही मक्केला जाऊन आलांत कीं नाहीं?' असें चांदूरकरांनीं त्यांना विचारलें, तेव्हां ते हंसून म्हणाले, 'नाहीं बुवा! मी अजून तरुण आहें—मला अजून पुष्कळ जीवन जगायचं आहे. मक्केला जाऊन आलं कीं कांहीं पाप करतां येत नाहीं म्हणे!'

मलायी लोक मुसलमान असूनहि पुष्कळ हिंदु चालीरीती ते पाळतात, असें सोनाळकर म्हणाले. त्यावर अझीझ ताबडतोब उत्तरले, 'याचं कारण मलायी

लोकांनीं राजीखुशीनें हिंदु धर्म सोडून मुसलमानी धर्म स्वीकारला. त्यांच्यावर तो कुणीं लादला नाहीं. त्यामुळें हिंदु धर्मांतलें जें कांहीं चांगलें आणि राखावेंसें वाटलें तें त्यांनीं राखून ठेवलें.'

रात्रीचे आठ वाजले तेव्हां आम्ही जायला उठलों. त्यापूर्वी त्यांनीं खरवसा-सारखें कांहीं गोड आम्हांला खायला दिलें. "नुकताच आमचा 'हरिराया' किंवा सणाचा दिवस होता. तेव्हां 'पुआसा' असतो म्हणून हें गोड केलें होतें," ते म्हणाले. मलायी लोकांचा 'पुआसा' म्हणजे आमचा 'उपवास' तर नव्हे ?

त्यांचे आभार मानून आम्ही बाहेर पडलों.

## कॅथे हॉटेलांत

कॅथे नांवाचें अकरा मजल्यांचें एक टोलेजंग हॉटेल सिंगापुरांत आहे. तिथें एक सिनेमागृहहि आहे. आज रात्रीं एक सुंदर इंग्रजी चित्रपट तिथें सुरू होणार होता. रोटरी क्लबतर्फे सोनाळकरांनीं या चित्रपटाचीं तिकिटें घेतलीं होतीं. सोनाळकरांच्याच घरीं जेवण करून आम्ही चित्रपट पाहायला गेलों. आजू-बाजूला सर्व ब्रिटिश स्त्रीपुरुष दिसत होते. चित्रपट संपल्यावर अश्वारूढ एलिझाबेथ राणीचें चित्र पडद्यावर आलें आणि 'गॉड सेव्ह दि क्वीन' गाणें सुरू झालें तेव्हां प्रेक्षक खडे उभे राहिले. भारत स्वतंत्र होऊन सात आठ वर्षें झाल्यामुळें हें सर्व मी विसरलों होतों. मला कसेसेंच वाटलें. सिंगापूर अजूनहि ब्रिटिश साम्राज्यांत असल्याची मला एकदम आठवण झाली.

मुख्य चित्रपट सुरू होण्यापूर्वीं छोटे वृत्तपट दाखविण्यांत आले. त्यांत सिंगा-पुरांत नुकत्याच झालेल्या आंतरराष्ट्रीय बॅडमिन्टन सामन्यांचीं कांहीं दृश्यें होतीं. अमेरिका विरुद्ध भारत सामन्यांत भारताला नंदू नाटेकर, डोंगरे वगैरे आमच्या खेळाडूंनीं विजय मिळवून दिला. तें दृश्य आल्याबरोबर चांदूर-करांनीं आणि मीं जोरानें टाळ्या पिटल्या. सबंध थिएटरांत आमच्याखेरीज कुणींहि हाताला हात लावला नव्हता. आमच्याच टाळयांचा आवाज आम्हीं ऐकला, आणि आम्ही एकदम थांबलों. आमच्या शेजारीं बसलेली एक गलेलठ्ठ ब्रिटिश म्हातारी कपाळाला आंठ्या घालून आमच्याकडे रोखून पाहात असलेली मला दिसली !

रात्रीं १२ ला बोटीवर परतलों.

२६ मे १९५५

## *सिंगापुरांतले मळेवाले*

आज दुपारीं साडेबारा वाजतां बोट सिंगापूर सोडणार. चार दिवसांनीं हाँगकाँग. सकाळीं साडेआठ वाजतां चहापाणी झाल्यावर बाहेर पडलों. रस्त्यांत फिरून अकरा साडे-अकराला बोटीवर परतण्याचा विचार केला. चांदूरकर म्हणाले, 'सिंगापूरचें रेल्वे स्टेशन तरी पाहूं या कसें काय आहे तें.' स्टेशन फारच भव्य आहे. प्रवेशद्वाराशीं चार प्रचंड स्तंभ आहेत. त्यांच्यावर कृषि, व्यापार, वहातूक आणि उद्योग अशा नांवाच्या चार आकृति कोरलेल्या आहेत. आंत गेल्यावर मात्र आश्चर्याचा धक्का बसला. सिंगापूर हें मुंबईएवढें नसलें तरी मुंबईसारखें एक मोठें शहर, पण या भव्य स्टेशनांत अक्षरश: शुकशुकाट होता. दोन चार ब्रिटिश सैनिक दूर एका कोपऱ्यांत उभे असलेले दिसले. इतरत्र हमाल, उतारू कुणी नाहीं. कसलीच गडबड कुठें दिसली नाहीं. सकाळीं एक आणि संध्याकाळीं एक अशा फक्त दोन गाड्या इथून मलायांत कुआलालंपूर, पिनांग वगैरे ठिकाणीं जायला सुटतात म्हणे. आम्ही येण्यापूर्वीं सकाळची गाडी सुटून गेली असावी.

स्टेशनांतला 'सेंट्रल हॉल' भव्य, प्रशस्त आणि सुशोभित आहे. भिंतींच्या वरच्या बाजूला चहूंकडे मोठमोठीं प्रचंड चित्रें रंगविलीं आहेत. मलायी जनतेच्या जीवनांतलीं दृश्यें त्यांच्यांत आहेत! कुठें शेत नांगरीत असलेले मलायी शेतकरी दिसतात, तर कुठें जस्ताच्या खाणींत काम करणारे खाण-कामगार दिसतात. स्टेशनांतलें पुस्तककेंद्रहि भलें मोठें आहे. चौकशीच्या खिडकीकडे एक तामीळ कारकून बसला होता. त्याच्याशीं थोडा वेळ गप्पा केल्या. "हाँग-काँगहून परततांना पुन्हा सिंगापुरांत दोन अडीच दिवस आम्ही थांबणार, आणि मग पिनांगला जाणार; तेव्हां सिंगापुराहून आगगाडीनें कुआलालंपूरला—म्हणजे मलायांतल्या मुख्य शहराला—जाऊन तिथून पिनांगला एक दिवस थांबणारी आमची बोट पकडतां येईल काय?" म्हणून आम्हीं त्याला विचारलें.

"शक्य आहे" तो म्हणाला, "शेवटच्या दिवशीं सकाळीं इथून सव्वा आठला निघणाऱ्या गाडीनें तुम्ही निघा. संध्याकाळीं ६ ला कुआलालंपूरला

पोहोंचाल. तिथें फिरायला दोन अडीच तास तुम्हांला मिळतील. लगेच साडे-आठच्या गाडीनें निघून दुसऱ्या दिवशीं सकाळीं पिनांगला पोहोचूं शकाल. तीस-पस्तीस मलायी डॉलर्स म्हणजे ४५-५० रुपये दुसऱ्या वर्गाच्या तिकिटांचे पडतील."

एक दिवसभर आगगाडींतून मलायाचा प्रदेश पाहतां येईल आणि दोन अडीच तास कुआलालंपूरमध्यें घालवतां येतील. पण गाड्या वेळेवर पोहोंचल्या नाहींत, किंवा चुकल्या तर पिनांगहून बोट निघून जायची, आणि चांगलीच फजिती व्हायची. तेव्हां हा विचार आला तसाच आम्हीं सोडून दिला.

साडेअकराला बोटीवर परत आलों. बंदरांत शिरतांना एका गटाराच्या कांठाशीं पांचसहा फाटक्या कपड्यांतले चिनी कामगार एक फलक हातांत धरून स्वस्थ बसलेले दिसले. सिंगापूर हार्बर बोर्डाचे ते संपावर गेलेले नोकर होते. फलकावर कामगाराचा विळा मालकाला तोडून टाकीत आहे असें चित्र होतें!

सिंगापुरांत बोटीवर चढलेल्या नव्या चिनी आणि युरोपियन उतारूंची आणि त्यांना पोहोंचवायला आलेल्या लोकांची एकच गर्दी उडाली होती. बरोबर साडेबारा वाजतां बोटीनें धक्का सोडला.

एक वाजतां जेवणघरांत गेलों. तों आमच्या टेबलावर दोन नवे सोबती आलेले दिसले. एक प्रतापसिंग नांवाचा उंच, धिप्पाड शीख होता, आणि दुसरा त्याचा मित्र २५-३० वर्षांचा चिनी तरुण रॉबर्ट्स. दोघेहि सुट्टी मजेंत घालविण्या-करितां हाँगकाँगला चालले होते. दोघेहि उत्तम इंग्रजी बोलत होते. 'माझे आईवडील साठ वर्षांपूर्वी मलायांत येऊन के. एल्. मध्यें स्थायिक झाले', प्रतापसिंग म्हणाला. के. एल्. म्हणजे कुआलालंपूर. मलायांत एवढें मोठें नांव उच्चारण्याऐवजीं बरेच लोक के. एल्. म्हणतात. प्रतापसिंग रबर तज्ज्ञ आहे. 'मळेवाल्यांना रबराच्या लागवडीबाबत सल्ला देण्याकरतां मला मलायां-तल्या खेड्यापाड्यांत, जंगल-पहाडांत खूप फिरावें लागतें,' तो म्हणाला.

'महायुद्ध थांबल्यापासून गेलीं कित्येक वर्षें मलायांतले कम्युनिस्ट जंगलांत राहून ब्रिटिशांविरुद्ध गनिमी युद्ध चालवीत असल्याचें आम्ही वृत्तपत्रांतून वाचतों. मधूनमधून ब्रिटिश मळेवाल्यांना ठार केल्याच्याहि बातम्या येतात. केवढें तरी मोठें ब्रिटिश सैन्य वर्षानुवर्षें जंगलांतल्या कम्युनिस्टांचा बींमोड

करण्यांत गुंतलें आहे. तुमची जंगलांत फिरतांना कधीं कम्युनिस्ट लढवय्याशीं गांठ पडली काय ?' म्हणून मीं त्याला विचारलें. 'इतक्या वर्षांत एकदांहि नाहीं,' तो म्हणाला, 'ब्रिटिश मळेवाल्यांना आणि जमीनमालकांना ते मारतात एवढं मात्र खरं !'

२७ मे १९५५

## *मिं. यिप्*

इंग्लंडमध्यें चालू असलेल्या सार्वत्रिक निवडणुकीचे निकाल आज सकाळीं ११, संध्याकाळीं ५, ७ आणि ९ वाजतां बोटीच्या रेडिओवरून ध्वनिक्षेपित होणार आहेत. त्यामुळें इंग्लिश उतारूंमध्यें मोठी खळबळ माजून राहिली आहे. हाँगकाँग इंग्रजांची वसाहत आहे आणि तिथें जाणारे बहुतेक उतारू व्यापारी आहेत; त्यामुळें हुजूरपक्षच बहुमतानें पुन्हा निवडून यावा अशी बहुतेकांची तीव्र इच्छा आहे. दुपारीं डेकवर बसून रेडिओवरून येणाऱ्या बातम्या मी ऐकत होतों. कॉन्झर्व्हेटिव्हांची सरशी होत असल्याच्या बातम्या होत्या. इंग्रज सहप्रवासी खुषींत दिसत होते. माझ्या शेजारच्या खुर्चीवर सिंगापुरांत बोटीवर आलेला एक चिमुकला चिनी गृहस्थ बसला होता. त्याच्या ओळखीचा जॉर्ज नांवाचा एक इंग्रज डेकच्या टोंकाशीं बिअर घेत उभा होता. माझ्याकडे वळून जॉर्जकडे पाहत तो चिनी गृहस्थ म्हणाला, 'पाहिलंत जॉर्ज कसा खुषींत आहे तो ! व्यापारी बच्चा आहे. मजूरपक्षाचं राज्य इंग्लडांत झालं तर आपल्या वसाहती ते सोडून देतील—मग व्यापार करून जॉर्ज गबर कुठं होणार ?'

या चिन्याचें नांव मि. यिप्. त्यानें उच्चार 'यिप्' केला; पण कागदावर लिहून देतांना, 'वाय ए पी' 'याप्' असें लिहिलें ! याप् ही एक खरोखरच 'अविस्मरणीय व्यक्ति' आहे. त्याचें तें खांदे उडवून स्वतःशींच हंसणें, मध्येंच आकाशाकडे डोळे लावून मिस्किलपणें कांहीं तरी उद्‌गारणें, चांगलें इंग्रजी, पण 'र' चा 'ल' करीत, कांहीं व्यंजनें गाळीत तुरुतुरु बोलणें—सर्वच कांहीं मजेदार होतें. माणूस बहुश्रुत, हुशार, विनोदी; पण आपण निश्चितपणें कोणत्या मताचे आहोंत याची दाद लागूं न देणारा धूर्त वाटला. भांडवलशाही, समाजवाद, डावें राजकारण यांचा त्याचा चांगला अभ्यास दिसला. इतिहास,

तत्त्वज्ञान, भारतीय राजकारण यांचीहि त्याला चांगली माहिती होती. 'चिन्यांचें मूळ वसतिस्थान तिबेट' तो म्हणाला, 'तुमच्या हिंदुस्थानांत आपण १९६५ सालीं येणार. बुद्धगया आणि सारनाथ पाहृचची मला फार इच्छा आहे. तोंपर्यंत तुमची भाषा शिकणार. एखाद्या देशाची भाषा आल्याशिवाय त्या देशांत फिरण्यांत कांहीं अर्थ नाहीं.'

'तुमच्या बोलण्यावरून तुम्हांला आमच्या देशाची बरीच माहिती दिसते.' मी म्हणालों.

'आहे थोडीशी,' आपले इवलेसे डोळे मिचकावीत तो म्हणाला, 'तुम्हां हिंदु लोकांना आठ मुलगे पाहिजे असतात ना?-- आम्हां चिन्यांना सात हवे असतात!'

गांधीजींबद्दल त्याला फार आदर दिसला. "तुमचे 'माम्मा गांदी' फार चांगले---फार चांगले," तो पुन्हा पुन्हा म्हणत होता.

त्याच्या विक्षिप्त बोलण्याचा नमुना म्हणून गांधीजींच्या वृत्तीचें त्यानें केलेलें वर्णन सांगण्यासारखें आहे. तो म्हणाला, 'पन्नास जहाजांत भारतांतल्या सगळ्या इंग्रजांना भरून तुम्ही इथून चालते व्हा म्हणून तुमचे गांधी इंग्रजांना सांगतील. पण त्यांचीं जहाजें किनारा सोडून दोन मैल गेलीं कीं त्यांना तुम्ही परत या असें ते म्हणतील! आमचे चिनी कम्युनिस्ट इंग्रजांना जहाजांत भरून एकदां समुद्रांत ढकलतील ते कायमचे!'

'चीनच्या कुठल्या भागांतले तुम्ही?' मीं त्याला विचारलें.

'आम्हांला आतां चीनचा कुठलाच भाग नाहीं,' आपले बारीक डोळे आणखीच बारीक करीत तो म्हणाला, 'आमचे पूर्वज दोनशें वर्षांपूर्वीं मलायांत आले.'

'काय हो,' त्यानें मला विचारलें, 'तुमच्या भारतांत बायका पुरुषांची पूजा करतात हें खरं का?'

मी जरा लाजल्यासारखा झालों. हंसून मी म्हणालों, 'तसं अगदीं देव्हाऱ्यांत बसवून गंध, फुलं वाहून, आरती ओंवाळून आमच्या बायका पुरुषांची दररोज पूजा करीत नाहींत; पण नवऱ्यासाठीं पुष्कळशीं व्रतंवैकल्यं करतात.'

'तुमचे ऋषिमुनि सुंदर स्त्रियांच्या पुढें हरल्याच्या गोष्टी तुमच्या पुराणांत आहेत, नाहीं?' त्यानें गंभीरपणें विचारलें.

'हो,' मी म्हणालों, 'कां ?'

'नाहीं,' त्यानें उत्तर दिलें, 'आमच्या चिनी भाषेंतहि एक म्हण आहे कीं सौंदर्याच्या द्वारांतून कोणताच वीर जाऊं शकत नाहीं !'

मि. यिपृशीं बोलतांना वेळ कसा जातो तें कळत नाहीं. मोठा मजेदार माणूस आहे.

आज रात्रीं ९ च्या सुमारास बोटीच्या ध्वनिक्षेपकावरून सांगण्यांत आलें कीं, कांहीं मैल दूर असलेल्या एका इटालियन बोटीवरल्या एका उतारूला अपघात होऊन त्याचा पाय मोडल्याचा बिनतारी संदेश आला आहे.

त्या बोटीवर डॉक्टर नाहीं; तेव्हां ती बोट आपल्याजवळ येऊन त्या उतारूला आपल्या बोटीवर पाठवणार आहे. बोटीवरल्या जीवनांत असला एखादा प्रसंग म्हणजे मोठीच खळबळ. आम्ही सर्व मोठ्या उत्सुकतेनें त्या बोटीची वाट पाहात डेकवर फिरत होतों. तास दीड तासानें पुन्हा आमचा ध्वनिक्षेपक बोलूं लागला, 'त्याला झालेली इजा फारशी गंभीर नाहीं. तेव्हां आमच्या बोटीची आणि त्या बोटीची भेट होत नाहीं !'

२८ मे १९५५

## नऊ नाग आणि गंधद्वीप

बोटीवर चांगलेंच उकडत आहे. समुद्रहि खवळलेला दिसतो. बोट फार हालत आहे.

डेकवर फारसे लोक नाहींत, आपापल्या खोलींत पडून आहेत. हाँगकाँग हें बेट आहे. त्याच्याखेरीज चीनच्या मुख्य भूमीचा कावलून हा हाँगकाँग-समोरचा भाग ब्रिटिशांकडेच आहे. यिपनें बोलतां बोलतां 'कावलून' आणि 'हाँगकाँग' या चिनी शब्दांचा अर्थ सांगितला. "कावलूनचा अर्थ 'नाइन् ड्रेगन्स', किंवा 'नऊ नाग'. लांबून कावलूमनधील डोंगरांच्या रांगा अस्ताव्यस्त पसरलेल्या नऊ अजस्र नागांसारख्या दिसतात," तो म्हणाला, "हाँगकाँग म्हणजे गंधद्वीप."

२९ मे १९५५

इंडो-चायनांत हो-चि-मिन्हचे कम्युनिस्ट सैनिक आणि फ्रेंच साम्राज्यवादी यांचें सध्यां तुंबळ युद्ध चालू आहे. कम्यूनिस्ट चीनचा हो-चि-मिन्हला पाठिंबा

आहे, तर इंग्लंड, अमेरिका साहजिकच फ्रेंचांच्या पाठीशीं आहेत. कालपासून आमची बोट इंडोचीनच्या किनाऱ्याजवळून चालली आहे. आज हैनानसमोर आम्ही आहोंत.

सकाळीं अकराच्या सुमाराला एक काळ्याभोर रंगाचें विमान बरेंच खालीं येऊन आमच्या बोटीशीं समांतर जाऊं लागलें. कुणाचें असेल हें विमान कोण जाणें, या विचारानें बोटीवरल्या आम्हां उतारूंत एकच खळबळ उडाली. इंडो चिनी कम्युनिस्टांच्या विमानानें एखादा बाँब या ब्रिटिश जहाजावर सहज टाकला तर मागाहून 'चूक झाली, माफ करा', वगैरे आंतरराष्ट्रीय प्रश्नोत्तरें होतील; पण बुडून गेलेले आम्ही लोक कांहीं परत जिवंत होणार नाहीं. थोड्या वेळानें कळलें कीं, तें विमान सध्यां या समुद्रांत गस्त घालणाऱ्या अमेरिकन आरमाराचें होतें.

## उडत बुडणारे डॉल्फिन्

सकाळीं हा भीतिदायक तर संध्याकाळीं एक आनंददायक प्रसंग घडला. इंग्रजी वाङ्मयांत 'डॉल्फिन्,' या सुदर माशाविषयीं वाचलें होतें. आज शेंकडों 'डॉल्फिन्' माशांचा एक तांडाच्या तांडा समुद्रांतून उड्या मारीत बोटीच्या बाजूनें जात असलेला दिसला. तो पाहायला सर्व उतारू डेकवर जमले होते. 'डॉल्फिन्' मासा शरीराची सफाईदार कमान करून पाण्यावर येतो, पुन्हा बुडी मारतो, तितक्याच सफाईनें पुन्हा बाहेर येतो, पुन्हा कमान करून बुडी मारतो—असा उभ्या नागमोडी चालीनें पाण्यांतून जातो. संध्याकाळच्या सोनेरी सूर्यप्रकाशांत चमचमत, निळ्या पाण्यांतून किती तरी 'डॉल्फिन्' उडत बुडत चालले होते. ते पाण्याखालीं असतात; पण पळतांना असे जातात म्हणे. आमच्या बोटीच्या पंख्याच्या आवाजानें भिऊन ते पळत होते.

३० मे १९५५

## कावलून - हाँगकाँग

आज हाँगकाँगला बोट लागणार. पहांटे सहा-साडेसहाला जागा झालों. केबिनच्या पोर्ट होलमधून दूर हाँगकाँग दिसत होतें. कडेखांद्यांवर पांढरीं घरें घेतलेले हिरवेगार डोंगर आणि पेट्रोलच्या रुपेरी टाक्या केबिनच्या

भोकासमोर वरखालीं होत होत्या. साडेआठला बोट धक्क्याला लागली. एक जोराची पावसाची सर आली आणि नंतर स्वच्छ ऊन पडलें. चीनच्या मुख्य भूमीचा भाग असलेल्या कावलून बंदराला बोट लागते. समोर हाँगकाँग दिसतें. लहानशा वाफोरांतून मधला समुद्राचा पट्टा ओलांडून हाँगकाँगला जायचें. कावलूनच्या धक्क्याकडून हाँगकाँगच्या धक्क्याकडे जाणारीं, किंवा तिकडून कावलूनला येणारीं वाफोरें पांचपांच मिनिटांनीं सुटत असतात. हाँगकाँग डॉलर सरासरी आपल्याकडल्या चौदा आण्यांइतका आहे. डॉलरचे शंभर सेंट. वाफोराचें तिकीट फक्त वीस सेंट आहे. कावलूनमध्यें राहणारे हजारों लोक सकाळीं हाँगकाँगमध्यें कचेऱ्यांत जाऊन संध्याकाळीं घरीं परत येत असतात. हाँगकाँगचा विमानतळहि कावलूनमध्येंच आहे. एअर इंडियाची कचेरी मात्र हाँगकाँगमध्यें आहे. मध्यें समुद्राचा पट्टा असला तरी ब्रिटिशांचें हाँगकाँग म्हणजे हाँगकाँग बेट, कावलून आणि कावलूनच्याहि डोंगरांपलीकडला,—दक्षिण चीनचें मुख्य शहर जें कॅन्टन त्याच्याकडे कावलूनहून जाणाऱ्या रेल्वेवरील वीस-एकवीस मैलांचा न्यू टेरिटरी हा प्रदेश.

कावलूनच्या धक्क्याला बोट लागली, तेव्हां समोरचें हाँगकाँग धुक्यांत गुरफटलेलें दिसत होतें. हळूहळू धुकें विरून जात होतें. आणि चारपांच हिरव्यागार डोंगरांच्या कुशीशीं, पोटाशीं बिलगलेलीं लहानमोठीं घरें मधूनमधून दिसूं लागलीं होतीं. बऱ्याचशा आधुनिक इमारती डोंगर फोडून उंचसखल ठिकाणीं बांधलेल्या असल्यामुळें त्या एकमेकांच्या खांद्यांवर उभ्या आहेत कीं काय असा भास होतो. धक्क्याला लागलेल्या बोटींवरून समोर कावलूनकडे पाहिलें तों एका इमारतीवरील कावलून पोस्ट ऑफिस ही पाटी स्पष्ट दिसत होती. थोडचा अंतरावर घुमट असलेल्या मनोऱ्यांची इमारत दिसली. कुणीतरी म्हणालें, हें हाँगकाँग-कॅन्टन रेल्वे स्टेशन. इकडेतिकडे पाहात होतों, इतक्यांत आमचे तरुण मित्र, हाँगकाँगमधल्या एअर इंडियाचे श्री. शरद् बंबावाले आम्हांला शोधीत बोटीवर आले. कावलूनच्या टोंकाला बाऊन्डरी रोडवर ते राहतात. जवळच विमानतळ आहे. तिथें त्यांचें काम असतें. 'एअर इंडिया' च्या कचेरींत माझें थोडें काम आहे; तेव्हां पलीकडे हाँगकाँगमध्यें जाऊं, तिथें थोडा वेळ भटकूं आणि मग दुपारीं आमच्याकडे जेवूं, ते म्हणाले.

त्यांच्याबरोबर आम्ही बाहेर पडलों, आणि स्टार फेरी कंपनीच्या वाफोरां-

तून पलीकडे गेलों. आकाशांत ढग जमले होते, आणि पुन्हा झुरुझुरु बारीक पाऊस पडूं लागला होता. डोंगरांवर इकडेतिकडे थोडेसें धुकेंहि दिसत होतें. उकडत नसतें तर ब्रिटिश बँका,कंपन्या, कचेऱ्या इत्यादिकांच्या इथल्या इमारती आणि एकंदर वातावरण पाहून लंडनमध्येंच फिरत आहोंत असें वाटलें असतें. एअर इंडियाच्या ऑफिसांत विमानानें आलेले गेल्या आठवड्याचे 'टाईम्स ऑफ इंडिया' चे अंक दिसले. अधाशासारखे वाचून टाकले. कित्येक दिवसांनीं मुंबईंतल्या बातम्या वाचायला मिळाल्या. नंतर बंबावाल्यांच्या बरोबर न्यू इंडिया इन्शुरन्स कंपनीच्या इथल्या कचेरींत गेलों. तिथें मॅनेजर नानावटीं-बरोबर बोलत बसलों असतां मॅनिलाहून आलेले श्री. आजगांवकर भेटले.

## *चिनी इंग्रजी !*

सिंगापूरप्रमाणेंच हाँगकाँगहि खुलें बंदर असल्यामुळें घड्याळें, कॅमेरे, कापड वगैरे वस्तू इथें अतिशय स्वस्त दरांत मिळतात. बंबावाल्यांच्या ओळखीच्या एका चिनी शिप्याच्या दुकानांत सुटाचें सुंदर कापड विकायला ठेवलें होतें. मला पुरा सूट नको होता, फक्त कोट करून हवा होता. 'सूट नको, फक्त कोट करून दे,' असें मीं त्याला म्हटलें, तेव्हां त्यानें नमुनेदार चिनी इंग्रजींत मला उत्तर दिलें, 'ओन्ली कोट नो कॅन् डू!'—म्हणजे फक्त कोट नाहीं करतां येणार! हाँगकाँगमध्यें सिंधी व्यापाऱ्यांचीं कापडाचीं मोठमोठीं दुकानें आहेत. तेहि इंग्रज किंवा अमेरिकन गिऱ्हाइकाबरोबर असलेंच इंग्रजी बोलतात. एखादा ब्रिटिश किंवा अमेरिकन सैनिक दुकानांत आला कीं, 'लुक सी बाय् बाय्—नो बाय्, गुड्बाय्!' म्हणजे 'पाहा, पाहा, विकत घ्या, नाहीं विकत घ्यायचं तर रामराम!' असें म्हणत सिंधी व्यापारी त्याच्या मागें मागें फिरत असतो. आमच्या बोटीवरला एक सिंधी व्यापारी मला म्हणाला, 'आमचे लोक व्यापाराकरितां जगभर पसरले आहेत—जिब्रॉल्टर, जकार्ता, मॅनिला, वेस्ट इंडीज कुठेंहि तुम्ही गेलांत तर सिंधी व्यापारी तुम्हांला भेटतील.'

इथल्या व्यापाऱ्यांचें एक विशेष तंत्र म्हणजे मुंबईंत ज्याप्रमाणें व्यापारी गिऱ्हाइकाला चहा पाजून खूष करतात त्याप्रमाणें व्हिस्की किंवा ब्रँडीचें पेय गिऱ्हाइकाला द्यायचें. कांहीं व्यापारी म्हणे अमेरिकन सैनिकांना खायला

प्यायला घालून मोटारींतून फिरवतात, आणि मग वाटेल त्या किमतीला आपला माल त्यांच्या गळीं उतरवतात.

## *चिनी आमा वरणभात करते*

बारा-साडेबाराला कावलूनला परतलों, आणि टॅक्सी घेऊन बंबावाल्यांच्या घरीं गेलों. त्यांच्या घराकडे जातांना एका बाजूला उघडयाबोडक्या लाल-पिवळया टेकडया दिसत होत्या. हिरव्यागार डोंगरांच्या माथ्यावर कांहीं ढग घोटाळत होते. एका अद्यावत् इमारतींत प्रशस्त फ्लॅट कंपनीनें बंबा-वाल्यांना राहायला दिला आहे. बंबावाले म्हणाले 'कपनी भाडं भरते म्हणून ठीक आहे. या फ्लॅटचं भाडं महिना अकराशें हाँगकाँग डॉलर्स म्हणजे जवळ जवळ हजार रुपये आहे!' हाँगकाँगमधलीं भाडीं, नोकरांचे पगार—एकंदर सर्वच राहणी फार महाग आहे. बंबावाल्यांकडे काम करणाऱ्या चिनी मोल-करणीचा पगार महिना एकशेतीस डॉलर्स म्हणजे जवळजवळ सव्वाशें रुपये! "मात्र स्वयंपाक, झाडलोट, कपडे धुणें—फार काय, कपडयांना रोज इस्त्री करणें,—सर्व कांहीं ती करते." बंबावाले म्हणाले, "या चिनी 'आमा' काम करणाऱ्या जबरदस्त!" सौ. बंबावाल्यांनीं तिला वरण, आमटी, चपात्या करायलाहि शिकवलें आहे. स्वतःचें चिनी जेवण म्हणजे वाडगाभर भात, उकडलेल्या भाज्या वगैरे ती स्वतः करून खाते, आणि आपल्या कामाला लागते. जेवण झाल्यावर बंबावाल्यांनीं आम्हांला केळीं खायला दिलीं, तीं फॉर्मोसाहून आलेलीं होतीं.

विश्रांति घेतल्यानंतर दुपारीं कावलूनच्या मुख्य रस्त्यावर भटकायला बाहेर पडलों. एखाद्या रस्त्याला नॅथान स्ट्रीट असें इंग्रजी नांव दिसलें तरी बऱ्याचशा रस्त्यांचीं नांवें पेकिंग रोड, हँको रोड, हायफाँग रोड अशीं चिनीच होतीं. हॉकी, बॅडमिंटन वगैरे खेळांचें सामान विकणाऱ्या एका दुकानांत बेळगांवचे श्री. वेलिंग या महाराष्ट्रीय गृहस्थांची गांठ पडली. लवकरच श्री. वेलिंग खेळाच्या सामानाचें स्वतःचें दुकान इथें काढणार आहेत. मिरामार हॉटेलांत ऑल इंडिया रेडिओचे डॉ. राम मराठे भेटले. भारतीय गायक-नर्तकांचें एक शिष्टमंडळ घेऊन ते चीनमध्यें कॅन्टनला जात आहेत. सफाईनें चिनी भाषा बोलणारे महाराष्ट्रीय श्री. परांजपे त्यांच्याबरोबर दुभाषे म्हणून

जात आहेत. डॉ. मराठ्यांच्या खोलींतून खालीं हॉटेलच्या दाराशीं आलों तों आणखी दोनतीन महाराष्ट्रीय मित्र, भारतीय मजूरसंघाच्या शिष्टमंडळांतून चीनला गेलेले हैद्राबादचे श्री. व्ही. डी. देशपांडे आणि मुंबईचे कॉ. गणाचार्य तिथें भेटले.

कपडे, घड्याळें, कॅमेरे वगैरे पाहात रस्त्यांतून फिरत असतां ' डेरीफार्म ' नांवाचें एक चहाचें दुकान दिसलें. बंबावाले म्हणाले, या चिनी दुकानांत चहा फार चांगला मिळतो. आम्ही चहा मागवला. इथें ताकहि चांगलें मिळतें, असें म्हणून बंबावाल्यांनीं स्वत:करतां ताक मागवलें. मात्र ताकाला इथें 'आंबट दूध '-सॉवर मिल्क् म्हणतात ! कचेऱ्यांतून बाहेर पडणारे सुशिक्षित चिनी चांगलेच गोरेपान आणि बूटसूट, टायशर्टात दिसत होते; तर बिस्किटें किंवा फुलें विकणारे रस्त्यांतले चिनी फेरीवाले ठराविक तुकतुकीत काळ्या कापडाच्या बंडी-पायजम्यांत आणि डोक्यावर उलट्या टोपलीसारखी मध्यें कळस असलेली टोपी–असे दिसत होते. बऱ्याचशा चिनी स्त्रियांचा वेषहि पुरुषांसारखाच काळ्या तुकतुकीत कापडाचा पायजमा आणि बंडी असा दिसतो. केसाचें चकर्डें, आपल्या इथल्यासारखाच अंबाडा किंवा चांगला लांबलचक वेणीचा शेपटा. मात्र सुशिक्षित, सुखवस्तु चिनी स्त्रिया इंग्रजी पद्धतीच्या रंगीबेरंगी फ्रॉक्मध्यें किंवा स्कर्ट-ब्लाऊज्मध्यें, किंवा खांद्यापासून गुडघ्यापर्यंत अंगाला तंग चिकटणाऱ्या चिनी पद्धतीच्या फ्रॉकमध्यें दिसतात. याला ' चाँगसाम ' म्हणतात असें कळलें. या तंग चाँगसाममध्यें रेखीव सडपातळ बांध्याच्या काळ्या कुळकुळीत केंसांच्या गोऱ्यापान चिनी तरुणी बाहुल्यासारख्या सुरेख दिसतात. फुलें किंवा बिस्किटें विकणारे फेरीवाले आपला माल खांद्यावर कावडीसारख्या बांबूला अडकविलेल्या टोपल्यांतून विकीत असलेले दिसले. बराच वेळ कावलूनमध्यें भटकून संध्याकाळीं बोटीवर परत आलों.

रात्रीं केबिनमध्यें बिछान्यावर पडलों आणि कुशीवर वळून सहज समोरच्या खिडकीवजा भोंकांतून समोर पाहिलें तर जागेपणीं लखलखीत रंगी-बेरंगी स्वप्न समोर दिसलें. हाँगकाँगमधल्या डोंगरांच्या कडेकपारी खोदून वरखालीं बांधलेल्या शेंकडों इमारतींवर लाल, पिवळे, हिरवे, निळे असंख्य निऑन् लाइट्स झळझळत होते. रत्नजडित सोन्याची लंका समुद्रांतून वर आली आहे,

कीं सागरानें आपलीं हिरे, माणकें, इंद्रनीळ मण्यांनीं खचित अशीं किरीट-कुंडलें बाहेर काढलीं आहेत?

३१ मे १९५५

## *लालचीनच्या हद्दीपर्यंत*

पहांटे लवकर उठून डेकवर आलों. समोर हाँगकाँगमधल्या डोंगरांच्या माथ्याभोंवतीं राखी पांढरे ढग घुटमळत असलेले दिसले. खालीं उतरून बंदरांत सहज फेरी मारायला गेलों. तिथें धक्क्याच्या आसपास आपण चीनमध्यें आहोंत याची आठवण करून देणारें,—लहानपणीं पुस्तकांत वाचलेलें दृश्य दिसत होतें. चीनमध्यें लोकसंख्या फार असल्यामुळें बरेच लोक बारा महिने नदीच्या पात्रांत किंवा समुद्रावर होड्यांमध्येंच राहतात आणि संसार करतात, असें वाचलें होतें. बंदरांत कितीतरी चिनी होड्या किंवा ' सांपन ' दाटीवाटीनें पाण्यांत डुचमळत होत्या. चिनी सांपनचीं शिडें आपल्याकडल्यापेक्षां वेगळीं, एक टोंक लांबलेल्या पतंगासारखीं चौकोनी, आणि घडीच्या पंख्यासारखीं जागच्या जागीं मिटतां येणारीं असतात. प्रत्येक होडींत सबंध कुटुंबाचा संसार होता. तुकतुकीत काळ्या कपड्यांतील पुरुष तोंड धूत होते, तर बायका चुली पेटवीत होत्या. कुठें मुलें वाडग्यांतलें खाणें काड्यांनीं पटापटा खात होतीं. कांहीं होड्यांवर पाळलेलीं कबुतरें आणि कोंबड्या फिरत असलेल्या दिसल्या; कांहींवर कुत्रीं, मांजरें घरांतल्यासारखीं पहुडलीं होतीं किंवा ये-जा करीत होतीं!

कावलूनपासून दक्षिण चीनचें मुख्य शहर कॅन्टन साठसत्तर मैल आहे. कावलूनहून कॅन्टनला रेल्वे जाते; पण कावलूनपासून वीस-एकवीस मैलांवर असलेल्या लोवू स्टेशनाकडे ब्रिटिश हद्द संपते, आणि पुढें शेंपन्नास यार्डांवर कम्युनिस्ट चीनची हद्द सुरू होते. चीनमध्यें जायचा चिनी सरकारचा परवाना असलेल्यांनाच पुढें कॅन्टनकडे जातां येतें. आजच हाँगकाँगमधल्या एका वृत्त-पत्रांत वाचलें कीं कुणीतरी एक ब्रिटिश वैमानिक १९५० सालापासून कम्युनिस्ट चीनच्या तुरुंगांत होता त्याला काल कॅन्टनहून लोवू येथें आणून सोडून देण्यांत आलें. आज दुपारीं लोवूपर्यंत जाऊन येण्याचा विचार करून तीन साडेतीनच्या सुमाराला कावलून स्टेशनांत गेलों. ४-२७ ला गाडी होती. रात्रीं ७-८ वाजे-

पर्यंत परत यायला गाडी आहे किंवा काय याची चौकशी करून आम्हीं रिटर्न तिकीट घेतलें. तिकिटांच्या खिडकींतला माणूस म्हणाला, 'लोवूच्या अलीकडल्या शेंगशुई स्टेशनाचं तिकीट घ्या. तुम्हांला नुसतं गंमतीनंच जाऊन यायचंय ना?—मग उगाच लोवूपर्यंत जाऊं नका. तिथं हद्दीवरले पासपोर्ट अधिकारी असतील. पलीकडे कम्युनिस्ट सैनिक असतील, अनेक चौकशा होतील. कशाला जातां लोवूपर्यंत?—दुसरं असं कीं, शेंगशुई-लोवूमधलं अंतर इतकं थोडं आहे कीं, शेंगशुईच्या फलाटावरून तुम्हांला लोवूचं स्टेशन, पलीकडील डोंगर वगैरे सहज दिसतात.'

आम्हीं त्यांचा सल्ला मानून शेंगशुईचेंच तिकीट घेतलें. बरोबर ४-२७ ला गाडी सुटली. दुसऱ्या वर्गाचे बांक गाद्यांचे होते. एका बांकावर दोन जागा होत्या. दोन बांकांमध्यें चहाचें लहानसें टेबल वगैरे चांगली व्यवस्था होती. राखी रंगाच्या गणवेषांतले छोकरे चॉकलेट, ग्रीन स्पॉटच्या बाटल्या, सिगारेट वगैरे विकीत मधूनमधून फिरत होते. लौकरच 'येवमाती' स्टेशन आलें. कावलूनच्या अगदीं शिवेजवळच हें स्टेशन आहे. बंबावाले राहातात तो बाउंडरी रोड इथून जवळच आहे. पलीकडे एका बाजूला उघडेबोडके लाल-पिवळ्या मातीचे डोंगर दिसत होते, तर दुसऱ्या बाजूला दूरवर हिरवेगार डोंगर दिसत होते. या बाजूला गरीब चिन्यांची वस्ती बरीच दिसते. डोंगराच्या पायथ्याशीं आणि आजूबाजूंना काळवंडलेल्या लाकडी फळ्यांच्या,–एकमेकांना खेटून राहिलेल्या झोपड्यांचे पुंजकेच्या पुंजके वडारांच्या पालासारखे दिसत होते. मध्येंच गाडी एका बोगद्यांत शिरली. बाहेर यायला तिला चांगलीं पांच दहा मिनिटें लागलीं, आणि कोळशाचें इंजिन असल्यामुळें डब्यांत धूरच धूर होऊन आम्ही गुदमरल्यासारखें झालों. बोगद्यांतून बाहेर आल्यावर समोरच्या डोंगरांत वर जाणारा एक घाटरस्ता आणि दारांत दीपमाळ असलेलें एक जुनाट बुद्धमंदिर दिसलें. आतां दोन्ही बाजूंना हिरवींगार भातशेतें, भाज्यांचे मांडव, फळांच्या बागा दिसत होत्या. मध्येंच एखाद्या खेड्यांतल्या गरीब शेतकऱ्यांचीं काळवंडलेल्या सिमेंटच्या पत्र्यांचीं घरें दिसत होतीं. चिनी लोक डुकरांचें मांस फार खातात. एखाद्या गांवांत गलेलठ्ठ डुक्कर चरत असलेल्या छोट्या गोठ्यांची लांबच लांब रांग दिसे. खेडवळ चिनी दुकानें मजेदार दिसतात. दुकानांसमोरच्या पिवळ्या खांबांवर काळीं अक्षरें एकाखालीं एक

लिहिलेलीं असतात. मध्येंच एखाद्या चिन्याचा किंवा ब्रिटिश साहेबाचा तांबडया खिडक्यांचा आणि हिरव्या कठड्यांचा टुमदार पांढरा बंगला दिसे. 'शाटीन' स्टेशनानंतर डोंगरांच्या रांगांतून मध्येंच एकदम समुद्र दिसूं लागला. समुद्रांत कुठेंकुठें मांडवासारख्या काठ्या उभ्या करून चिनी कोळ्यांनीं लावलेलीं जाळीं दिसत होतीं. तें मोठें अद्‌भुतरम्य निसर्गदृश्य दिसत होतें. आकाशांत ढग जमून चांगलाच पाऊस पडत होता. हिरव्यागार डोंगरांवर कुठेंकुठें दाट धुकें दिसत होतें; तर कुठें खंडाळ्याच्या घाटांतल्यासारखे छोटे छोटे धबधबे कोसळत होते. एका बाजूला समुद्र, एका बाजूला हिरव्यागार डोंगरावरले धबधबे आणि वरून पाऊस——पावसाच्या धारांखालीं घाट आणि कोंकण एकमेकांना बिलगल्यासारखीं दिसत होतीं! एका डोंगरांत बऱ्याच ठिकाणीं खोदल्यासारखें दिसत होतें. तिथें शिशाच्या आणि लोखंडाच्या खाणी आहेत म्हणे.

## *चिनी स्टेशनांत पाकिस्तानी नासीर-हुसेन*

त्यानंतर 'तायपो' स्टेशन आलें. स्टेशनापलीकडे बरींच दुकानें आणि चिनी बायकापुरुषांची गर्दी दिसत होती. हें फार जुनें गांव आहे, आणि इथें मासे आणि फळांचा फार मोठा व्यापार चालतो. गाडी सुटली, आणि आजू-बाजूंना हिरवेगार डोंगर आणि हिरवींगार भातशेतें दिसूं लागलीं. शेतांत काम करणाऱ्या तुकतुकीत काळ्या कपड्यांतल्या चिनी शेतकरणींच्या डोक्यावर चटईच्या घंगाळटोप्या आणि अंगावर प्लास्टिकचे निळे पाऊसकोट दिसत होते. नंतर 'फातलिंग' स्टेशन आलें. पुढच्या 'शेंगशुई' स्टेशनावर आम्ही उतरणार. आमच्या डब्यांतली एक चिनी बाई आपल्या तान्ह्या मुलाला घेऊन 'फातलिंग' स्टेशनांत उतरली. तांबड्या रेशमी कापडाची चार टोकांना चार पट्ट्या लावलेली एक चिमुकली गोधडी तिच्याकडे होती. तिच्यांत मुलाला ठेवून तिनें तें आपल्या पाठीशीं बांधलें व हातांत इतर सामान घेऊन ती गाडींतून उतरली. कावलूनमध्यें कामाला आलेले बरेच चिनी स्त्री-पुरुष गाडींत होते. आम्ही इकडेतिकडे पाहात होतों. इतक्यांत आमच्या-सारखाच भारतीय दिसणारा एक तीस-पस्तीस वर्षांचा गृहस्थ आमच्याकडे आला, आणि 'तुम्ही हिंदी आहांत का?' म्हणून त्यानें आम्हांला विचारलें.

'हो,' आम्ही म्हणालों.

'माझं नांव नासीर हुसेन. मी पाकिस्तानी आहें,' तो म्हणाला, 'मी इथंच असतों. तुम्हांला बघून किती आनंद झाला मला! कांहीं झालं तरी एकाच देशांतील आपण.'

'शेंगशुई' आणि 'लोवू' स्टेशनांमध्यें कम्युनिस्ट चीनच्या सीमेअलीकडे शंभर यार्डावर डोंगराच्या पायथ्याशीं नदीकांठीं तो एकटाच राहात होता. अतिशय मोकळेपणानें तो आमच्याशी गप्पा करीत होता. खरोखरच त्याला फार आनंद झालेला दिसला. कावलून, न्यू टेरिटोरीजमधल्या ब्रिटिश सैन्याला न्हावी, धोबी, शिपी, चांभार पुरवण्याचें कंत्राट त्याच्याकडे होतें. ब्रिटिशांच्या मलायांतल्या सैन्यांत गुरखे आहेत तसेच इथल्या सैन्यांत दोनतीनशें पाकिस्तानी असल्याचें त्यानें सांगितलें. पाकिस्तानी पंजाबांतल्या गुजरात गांवांत त्याचें घर; पण आईबाप इजिप्तमध्यें राहायला गेलेले! नासीर हुसेन कांहीं दिवस सायप्रसमध्यें होता. शेंगशुईत आपलें बरें चाललें आहे, तो म्हणाला.

एकंदर चिनी लोकांविषयी त्याचें वाईट—म्हणजे फारच वाईट मत दिसलें. 'माझ्या हाताखाली शेपन्नास चिनी स्त्रीपुरुष काम करतात'; तो म्हणाला, 'चोर-बदमाष, गंदे...'

'त्यांना इतक्या शिव्या द्यायला काय झालं?' मी म्हणालों.

'काय सांगू तुम्हांला? भारी घाणरडे लोक हो! काळ्या कंतानाचे कपडे बायका नि पुरुष उगाच नाही घालीत ते—आंघोळ कधी करीतच नाहींत. ओल्या टॉवेलनं कधींमधीं अंग पुसतात. साप, बेडूक, कुत्री, मांजरं—सर्व कांहीं खातात! कोंबडीचे पाय नि चोंचसुद्धां शिल्लक ठेवीत नाहीत हो! वर्तनहि तसंच घाणेरडं. व्यवहारांत काय नि कुटुंबांत काय, नीति म्हणून कसली नाहींच! ....'

त्याच्याकडे काम करणाऱ्या अगदीं खालच्या वर्गातल्या मोलमजुरी करणाऱ्या चिन्यांसंबंधीं तो बोलत होता, हें उघड आहे. स्वच्छ परीटघडीचे सुदर युरोपियन पद्धतीचे कपडेलत्ते केलेले किती तरी चिनी स्त्री-पुरुष आम्हीं हाँगकाँगच्या रस्त्यांवर पाहिले होते. मात्र चिनी लोक कुत्रीं, मांजरेंसुद्धां खातात, ही गोष्ट खोटी नसावी; कारण आजच्याच 'हाँगकाँग स्टॅण्डर्ड' कीं दुसऱ्या कुठल्या तरी पत्रांत एका चिनी बाईला मेलेल्या मांजराची कातडी सोलून तें खाण्या-

करतां कापीत असतां पोलिसांनीं पकडल्याचें, आणि मॅजिस्ट्रेटनें तिचा हा असल्या प्रकारचा दुसऱ्यांदा केलेला गुन्हा असल्यामुळें पाऊणशें डॉलर दंड केल्याचें मीं वाचलें होतें. एका वृत्तपत्रांत एका युरोपियन प्रवाशानें केलेलें चोरटी अफू ओढण्याच्या हाँगकाँग-कावलूनमधल्या गुप्त अड्ड्यांचें वर्णन वाचलें. चोरट्या दारूचे मुंबईंत असेच अड्डे आहेत. दारूच्या गुत्त्यांत ज्या-प्रमाणें उकडलेलीं अंडीं किंवा मसालेदार मटन खायला देतात त्याप्रमाणें कावलूनमधल्या या अफूच्या अड्ड्यांत कोंवळ्या कुत्र्याचें मांस खायला देतात. सहा महिन्यांच्या आंतल्या वयाच्या आणि काळ्या रंगाच्या कुत्र्याचें मांस विशेष किमतीला विकलें जातें. अट्टल चिनी अफूबाज वाटेल ती किंमत देऊन तें मिटक्या मारीत खातात! अफू आणि कुत्र्याचें मांस या दोहोंनाहि कायद्यानें कडक बंदी आहे. त्यामुळें या चोरट्या अड्ड्यांत प्रवेश मिळवायला 'आंतली' ओळख आपण कशी काढली तेंहि या लेखांत सांगितलें होतें!

## उकडलेले टोळ आणि नाकतोड्यांचें लोणचें

बोलतां बोलतां 'शेंगशुई' स्टेशन आलें. संध्याकाळचा साडेपांच-सहाचा सुमार झाला होता. आकाश ढगाळलें होतें. पाऊस झिम् झिम् पडतच होता. 'शेंगशुई' हें आमच्या मुंबईजवळच्या भाइंदर किंवा मिरारोडसारखें अगदींच छोटें स्टेशन आहे. अर्ध्या तासानें परत जायला गाडी होती. तेव्हां स्टेशना-च्याच आवतींभोंवतीं इकडेतिकडे फिरण्याचें आम्हीं ठरविलें. स्टेशनांतून 'शेंगशुई' रस्त्याची नि पलीकडे डोंगराच्या पायथ्याशीं पांच-दहा पांढऱ्या घरांचा पुंजका असलेल्या सरहद्दीवरल्या 'लोवू' खेड्यांची चांगली कल्पना येत होती.

'त्या लोवूच्या डोंगराच्या पलीकडे झाडी दिसते ना? तिथेंच लहानशी नदी आहे. तिथल्या एका घरांत मी राहातों,' फलाटावरून ती झाडी दाखवीत नासीर हुसेन सांगत होता. फलाटावर एक लहानसें चहाचें दुकान होतें. तिथें आग्रह करून नासीरनें आम्हांला नेलें. 'चहा किंवा कांहींतरी पेय तुम्हीं घेतलंच पाहिजे,' तो म्हणाला, 'खरं म्हणजे तुम्ही माझे पाहुणे आहांत इथं. घरीं नेऊन तुम्हांला जेवण दिलं पाहिजे मीं. पण तुम्हांला परत जायची घाई आहे. मीहि एकटा राहातों–जेवण तरी काय देणार?' 'ग्रीन स्पॉट' पेय त्यानें

आम्हांला दिलें. स्टेशनांतलें तें चहाचें दुकान फार तर सहा फूट लांब आणि पांच फूट रुंद असेल. बिस्किटांच्या बरण्या, कपबशा, एक टेबल आणि कांहीं खुर्च्या तिथें होत्या. दुकानाला लागूनच त्याहूनहि लहान चारपांच फूट लांबी-रुंदीचें स्वयंपाकघर होतें. तिथें त्या चिनी दुकानदाराचा सर्व संसार होता. नवऱ्याप्रमाणेंच तुकतुकीत काळ्या कपड्याचा सदरा पायजमा घातलेली त्याची बायको चुलीकडे कांहींतरी करीत बसली होती. सगळीकडे सारख्या माशा घवघवत होत्या. मध्येंच कोंबड्या 'को' 'को' करीत येऊन पायाशीं अडखळत होत्या. भिंतीला बांधलेल्या मच्छरदाणीखालीं जमिनीवर टाकलेल्या फडक्यावर एक लहान मूल झोपलें होतें. सतरा-अठरा वर्षांचा दांडगट दिसणारा एक चिनी पोरगा टेबलावर दोन भले मोठे पाव आणि दुधाचा वाडगा घेऊन खायला बसला होता. 'मालकाचा हा मुलगा', नासीर हुसेन म्हणाला. मालकाशीं चिनी भाषेंत नासीर कांहीं बोलत होता, इतक्यांत मोठ्या थोरल्या दुधी भोपळ्याच्या आकाराच्या दोन टोपल्या दोन टोंकांना अडकवलेली कावड खांद्यावर घेऊन फलाटावर एक चिनी शेतकरी आला. कावड फलाटावर ठेवून तो उभा होता. 'त्या टोपल्यांत काय आहे ?' आम्हीं नासीरला विचारलें.

'तुम्हीच त्याला विचारा,' तो हंसून म्हणाला.

त्या शेतकऱ्याजवळ जाऊन खुणेनें या टोपल्यांत काय आहे, म्हणून मीं विचारलें. तोंडाकडे हात नेऊन तो 'चाव' म्हणाला. 'चाव' म्हणजे खाणें. हातवारे करीत 'इकडूनतिकडून पकडून आपण तें या टोपलींत ठेवलें आहे', असें तो सांगत होता. टोपली उघडूं का, असें खुणेनें विचारून आम्हीं एक टोपली उघडून पाहिली. शेतांत उडणारे हिरवेगार नाकतोडे टोपलींत भरलेले होते. ते एकदम उडून जाऊं नयेत म्हणून वर हिरवेंगार गवत भरलें होतें.

नासीर म्हणाला, 'हे लोक हे नाकतोडे खातात!'

'काय—म्हणतां काय ?' मी उद्गारलों.

'सांगितलं ना ? नाकतोडे, टोळ, सर्व कांहीं हे लोक खातात,' तो म्हणाला, 'टोळ तर मुद्दाम खातात. टोळ आमचं धान्य खातात म्हणून आम्ही त्यांनाच खाऊन टाकतों, असं हे म्हणतात! टोळधाड आली कीं गोणी भरून टोळ पकडायचे, ती गोणी उकळत्या पाण्यांत बुडवायची नि मग त्या उकडलेल्या टोळांवर ताव मारायचा!'

## *हाँगकाँगचे आह् फेङ्*

स्टेशनाच्या बाजूला एक तळें होतें. त्यांत कोबीच्या पानासारख्या दिसणाऱ्या लेटयूस भाजीच्या टोपल्या कावडीनें वाहून आणून शेतकऱ्यांच्या बायका धुण्याकरतां टाकीत होत्या. स्टेशनच्या बाहेर समोरच एक हिरव्या फळ्यांची टुमदार इमारत दिसत होती. तिच्यावर 'शेंगशुई व्हेजिटेबल मार्केटिंग को-ऑपरेटिव्ह सोसायटी,' अशी पाटी होती.

'अगदींच छोटं खेडं आहे हें,' नासीर हुसेन सांगत होता, 'इथं राह्यचं म्हणजे अक्षरशः वनवास आहे. कोणत्याहि प्रकारची करमणूक इथं नाहीं. हाँगकाँगमध्यें 'आन' किंवा 'आवारा' सारखा एखादा हिंदी चित्रपट केव्हां केव्हां येतो. तेव्हां तिथं जाऊन पाह्यचा.'

स्टेशनाच्या दाराशीं सायकल घेऊन उभ्या असलेल्या एका चिन्याला बोलावून नासीर चिनी भाषेंत त्याच्याशीं कांहीं तरी बोलत होता.

आमच्याकडे बघून तो चिनी त्याला म्हणाला, 'तानशी यक्को ?'

तो काय म्हणाला, म्हणून आम्हीं नासीरला विचारलें. 'तानशी यक्को' म्हणजे एकट्यालाच का ?' 'तुला एकट्यालाच न्यायचं कीं पाहुण्यांनामुद्धां' असें तो सायकलवाला नासीरला विचारीत होता. शेंगशुईत वाहनाची ही औरच तऱ्हा आहे. सायकलच्या मागें एक छोटीशी फळी लावलेली असते. पिन्वर उभें राहतात तसें त्या फळीवर गिऱ्हाइकानें उभें राह्यचें, आणि सायकलवाल्याला हवें तिकडे न्यायला सांगायचें !

'माझ्या घरापर्यंत न्यायला काय घेशील म्हणून त्याला मी विचारतोंय,' नासीर म्हणाला, 'नेहमीं अर्ध्या हाँगकाँग डॉलरमध्यें म्हणजे सात आण्यांत हे रोज तिथपर्यंत येतात. आज पाऊस पडतोय् ना--म्हणून हा लुच्चा सबंध डॉलर माझ्याकडे मागतोय् !'

इतक्यांत गाडी आली आणि नासीरचा निरोप घेऊन आम्ही गाडींत चढलों.

सात सव्वासातला 'येवमाती' स्टेशनांत उतरून बंबावाल्यांच्या घरीं जेवायला गेलों. वांग्यांची सुंदर भाजी केली होती. बंबावाले म्हणाले, "कृष्णा-कांठच्या वांग्यांसारखीं सुंदर वांगीं हाँगकाँगमध्यें मिळतात !"

रात्रीं साडेदहा-अकराच्या सुमाराला बोटीवर परत आलों. बंदराच्या

आसपास काळ्या कपड्यांतले कितीतरी मवाली दिसणारे उंच, ठेंगू, लठ्ठ, सडपातळ चिनी स्त्रीपुरुष उगाच इकडेतिकडे घिरट्या मारीत असलेले दिसले. कोणत्याहि बंदराजवळचें वातावरण बहुधा बकाल असतें. काळोख्या कोना-कोपऱ्यांत संशयास्पद हालचाली करणाऱ्या त्या लोकांना पाहून थोडी भीतीच वाटली. आज सकाळींच हाँगकाँगच्या वृत्तपत्रांत शहरांतल्या गुंडगिरी-बद्दल बरेचसें वाचलें होतें. सुशिक्षित गुंडांच्या चाळ्यांबद्दल एका वृत्तपत्रानें अग्रलेखच लिहिला होता. इंग्लंडमध्यें जसे 'टेडी बॉईज्' किंवा अमेरिकेंतले 'झूटसूटर्स' तसेच हाँगकाँगमधले हे गुंड. त्यांना 'आह् फेइ' म्हणतात. 'जीं' किंवा तंग निळ्या तुमानी आणि रंगीबेरंगी शर्ट घालून दहा दहा, अकरा अकरांच्या टोळ्या करून हे 'आह् फेइ' फिरतात. शाळेंत जाणाऱ्या मुलींना सतावणें, मुलांना एकटेदुकटे गांठून फीचे पैसे त्यांच्या खिशांतून काढून घेणें, बायकांच्या पोहोण्याच्या जागांभोंवतीं घिरट्या घालणें, इतर नागरिकांनाहि अधूनमधून लुबाडणें, असले प्रकार करीत हे चिनी तरुण गांवांत फिरत असतात.

१ जून १९५५

## प्रो. शिह्-चेन्-पिंग

हाँगकाँगमधल्या एक दोन चिनी मित्रांना श्री. प्रभाकर पाध्ये यांनीं पत्रें दिलीं होतीं. त्यांना भेटायला प्रातरुपाहारानंतर सकाळीं १० वाजतां बाहेर पडलों. कावलूनच्या दूरच्या टोंकाला एकाला भेटण्याकरतां गेलों, पण ते परदेशीं गेल्याचें कळलें. ग्रॅनव्हिल् रोडवर राहणारे प्रोफेसर शिह्-चेन्-पिंग् यांच्याकडे दुपारीं सव्वाबाराच्या सुमारास पोहोंचलों. सुदैवानें ते घरीं होते. दारावरची घंटा वाजवली तेव्हां एक वृद्ध चिनी नोकर बाहेर आला. शिहूचें नांव घेतलें तेव्हां खुणेनें तो 'ह्ो' म्हणाला; आणि दार उघडून मला त्यानें आंत घेतलें. हंसऱ्या चेहेऱ्याचा हा चिनी म्हातारा फारच आतिथ्यशील होता. खूप खालीं मान लववून त्यानें मला आंत येण्याची खूण केली; आणि दिवाणखान्यांतल्या कोचावर बसायला सांगून 'श्रेव्हन् ए' सिगारेटचा डबा आणि काड्यांची पेटी पुढ्यांत ठेवली. धांवतच तो कोपऱ्याकडे गेला, आणि कांचेच्या खुज्यांतलें थंडगार पाणी एका ग्लासांत ओतून त्यानें माझ्या पुढ्यांत आणून ठेवलें. इतकें सर्व केल्यावर तो आंत गेला. थोड्याच वेळांत शिहू बाहेर आले. मी

भेटायला आल्याबद्दल त्यांनीं मनःपूर्वक आनंद व्यक्त केला. 'आज दुपारचें जेवण तुम्हीं इथेंच केलें पाहिजे, बोटीवर जायचें नाहीं,' असें म्हणून त्यांनीं आग्रहानें मला जेवायला ठेवून घेतलें. पूर्वीं कॅन्टनमधल्या अमेरिकन विद्यापीठांत राज्यशास्त्राचे प्राध्यापक असलेले आणि पाहुणे प्राध्यापक म्हणून कांहीं महिने दिल्ली विद्यापीठांत काम केलेले डॉ. वू जेवायला यायचे होते. त्यांना यायला अर्धा-पाऊण तास होता. तोंपर्यंत आम्ही गप्पा करीत बसलों.

१९४९ सालीं सारा चीन देश कम्युनिस्टांच्या वर्चस्वाखालीं आला, त्याआधीं प्रोफेसर शिह् चेन्-पिंग नानकिंग विद्यापीठांत पाश्चिमात्य इतिहासाचे प्राध्यापक होते. कांहीं काळ पूर्वीच्या चिनी सरकारच्या शेतकीखात्यांतहि त्यांनीं काम केलें होतें. नियतकालिकांच्या संपादनाचा आणि पुस्तक प्रकाशनाचाहि त्यांना चांगला अनुभव होता. म्हणूनच हाँगकाँग-कावलूनमध्यें त्यांनीं एक प्रकाशनसंस्था स्थापली आणि हाँगकाँगमधल्या न्यू एन्लायटन्मेन्ट प्रेसचे डॉ. हेन्री वँग यांच्या साहाय्यानें एक चिनी भाषेंतलें सायंदैनिक, एक साप्ताहिक आणि एक इंग्रजी पाक्षिक अशीं नियत कालिकें सुरू केलीं. इंग्रजी पाक्षिकाचें नांव 'फ्रीडम् फ्रंट'. त्या वेळीं चीनमध्यें कम्युनिस्ट क्रांति नुकतीच झाली होती; आणि हाँगकाँगमध्यें कम्युनिस्ट हुकूमशाहीचा प्रचार करणारीं चिनी भाषेंतलीं 'लाल' पत्रेंच बरीचशीं होती. या प्रचाराची लाट परतवण्याचें कठिण काम आमच्या लोकसत्तावादी नव्या पत्रांनीं फारच यशस्वी रीतीनें केलें, शिह् म्हणाले.

## *शिह्चें मावसंबंधीं मत*

'तुम्ही फॉर्मोसांत पळालेल्या चांग-कै-शेकचे अनुयायी आहांत कीं काय ?' मीं विचारलें.

'मुळींच नाहीं,' आवेशानें प्रो. शिह् म्हणाले, 'तसं असतं तर मी फॉर्मोसांत गेलों असतों, इथं राहयलों नसतों. मी नि इथले माझे मित्र, सहकारी, विद्यार्थी–आम्ही सारे हुकूमशाहीविरोधी, पण स्वतंत्र, लोकसत्तावादी चीनचे पुरस्कर्ते आहोंत. चांग-कै-शेक हा सरंजामी हुकूमशाहीवादीच आहे. त्याच्या मूर्खपणामुळेंच चीन कम्युनिस्टांच्या तावडींत गेला. त्याला चीनमधला शेतजमिनीचा प्रश्न मुळींच सोडवतां आला नाहीं. चीनचाच काय,–साऱ्या आग्नेय

आशियाचाच हा प्रश्न आहे. जो कुणी हा प्रश्न सोडवील तो आग्नेय आशियांतल्या सर्व देशांचा तारक ठरेल ! '

'अस्सं ? ' मी म्हणालों, 'तुमच्या मावत्सेतुंगनं चीनमध्यें जमिनीचा प्रश्न सोडवून टाकलाय् कीं—'

'चांगलाच सोडवून टाकलाय् ! ' शिह् उद्गारले, 'शेतकऱ्यांना आणि बुद्धिजीवि मध्यमवर्गीयांना माव्च्या कम्युनिस्ट पक्षानं चांग-कै-शेकच्या मध्ययुगीन सरंजामशाहींतून सोडवतों असं सांगून क्रांति केली; आणि आतां त्यांना कम्युनिस्ट हुकूमशाहीच्या गुलामगिरींत जखडून टाकलं ! कम्युनिस्टांच्या राज्यांत सामान्य चिनी माणसाला सबंध दिवसांत जेमतेम दोन औंस तांदुळाचा भात खाऊन कसं तरी जगावं लागतं. वर आणखी सरकार सांगेल तें काम निमूटपणें करावं लागतं—'

'असं कसं ? ' मी म्हणालों, 'अलीकडे कम्युनिस्ट चीननं कित्येक हजार टन तांदूळ आमच्या भारतांत निर्यात केला—' 'खरं आहे' शिह् म्हणाले, 'हाँगकाँगमध्येंहि चीनहून तांदूळ येतो. पैसे करण्याकरितां घरच्या लोकांना उपाशी ठेवून कितीतरी वस्तु आणि धान्य कम्युनिस्ट देश निर्यात करीत असतात. माव्नें लष्करी किंवा निमलष्करी व्यवसायांत दहा कोटी लोक अडकवलेत, आणि कम्युनिस्ट सरकारच्या नोकरशाहींत आणखी दहा कोटी भरलेत. हे वीस कोटी म्हणज चीनची एक-तृतीयांश लोकसंख्या झाली. या एक-तृतीयांशाला भरपूर खायलाप्यायला देऊन कम्युनिस्टांनीं आपल्या मुठींत ठेवलें. चीनमधले जमीनदार नि सरंजामदार गेले, पण वीस कोटींचा हा नवा सत्ताधारी वर्ग उरलेल्या चाळीस कोटी सामान्य नागरिकांना चांगलंच पिळून काढतोय् ! -

## *टायगर आणि फिनिक्स*

इतक्यांत डॉ. वू आले. तो म्हातारा चिनी नोकर आणि एक चिनी मोल' करीण जेवणाचें टेबल मांडीत होतीं. प्रो. शिहांचे बहात्तर वर्षें वयाचे वडील, कॅलिफोर्नियांत सॅन्फ्रॅन्सिस्को येथें शिक्षण घेतलेल्या मादाम शिह् आणि त्यांचीं तीन मुलें आम्ही बोलत असतां तिथें येऊन बसलींच होतीं. सौ. शिहूचें शिक्षण अमेरिकेंत झालेलें असल्यामुळें त्या उत्कृष्ट इंग्रजी बोलत होत्या. चिल्ड्रन, कल्चर इत्यादि शब्दांचे उच्चार प्रो. शिह् 'चॉल्ड्रन्' 'कॉल्चरल' असे चिनी

पद्धतीनें करीत होते. पण मादामचे इंग्रजी उच्चार सफाईदार होते. सडपातळ चिमुकल्या बांध्याच्या सौ. शिहूचा चेहरा रेखीव, तरतरीत होता. सुंदर चिनी बाहुलीसारख्या त्या वाटल्या. आपल्या तिन्ही मुलांची त्यांनीं ओळख करून दिली. मुलांच्या चिनी नांवांचा अर्थ इंग्रजींत त्या मला सांगत होत्या. दहा-बारा वर्षांचा मोठा मुलगा—हा आमचा 'टायगर'—त्याच्या मागला हा 'लिट्ल ड्रेगन्'—नि ही सर्वांत लहान मुलगी—'फिनिक्स'. गुटगुटीत, गुलाबी चेहऱ्याची छोटी 'फिनिक्स' अगदीं बाहुलीसारखी होती. चिनी नांवें हीं असलीं तरी मुलीला 'कॅथरीन्,' मुलांना 'डेव्हिड्,' 'मिचल्' या इंग्रजी नांवांनीं आईवडील हांक मारीत होतीं. माझ्याकडे पाहून प्रो. शिहूनीं मुलांना विचारलें, 'हे पाहुणे इंग्लिश आहेत, इंडियन आहेत कीं, अमेरिकन आहेत ?—ओळखा पाहूं ! ' मुलें ताबडतोब ओरडलीं, 'इंडियन् ! '

शिहांचे वृद्ध वडील उंच, धिप्पाड बांध्याचे होते. त्यांना इंग्रजी फारसें येत नव्हतें. त्यांची ओळख करून देतांना शिहू म्हणाले, 'हे मोठे जमीनदार होते. एके काळीं यांनीं राजकारण केलंय, लढाया लढल्या, व्यापाराच्याहि उलाढाली केल्या ! '

म्हाताऱ्यानें स्मित करून डोकें लववलें.

डॉ. वू म्हणाले, 'ही सर्व मंडळी दक्षिण चीनमधली—कॅन्टनजवळची आहेत—यांची चिनी भाषा जास्त शुद्ध असते. उत्तरेकडे मांचूंच्या स्वाऱ्या झाल्या त्याचा परिणाम भाषेवर झाला. तुमच्याकडे नाहीं का, दक्षिण भारतावर मुस्लिम संस्कृतीचा उत्तरेसारखा परिणाम झालेला नाहीं.'

## *चिनी जेवण*

बाजूला एका छोट्या टेबलावर मुलें जेवायला बसलीं. मोठ्या टेबलावर शिहू, त्यांचे वडील, सौ. शिहू, डॉ. वू आणि मी बसलों. नेहमींचें चिनी जेवण—भात, भाज्या, डुकराचें मांस यांचें असतें. तें होतेंच, पण पाहुण्यासाठीं म्हणून शेजारच्या चिनी दुकानांतून शिजवलेलें बदक आणि एक मोठा थोरला गुबगुबीत मासा मुद्दाम आणवला होता. मांसाहार किंवा मत्स्याहार मला चालत असला तरी तो बेताचाच. मोठमोठे मांसखंड किंवा मत्स्यखंड माझ्याच्यानें खाववत नाहींत. पुढ्यांतला तो मासा आणि बदक पाहून मी चपापलों होतों.

पण भाजीच्या बिनतिखट मिरच्या घातलेली पालेभाजी होती, बाजूला गरम गरम भात असलेला कांचेचा वाडगा होता, आणि आपल्या छोटया चिनी-मातीच्या भांडयांत तो वाढून घेण्याकरतां त्यांत एक मोठें डावलेंहि ठेवलेलें होतें. आपापल्या दोन दोन काडया घेऊन भाज्या, बदक, मासा, पोर्क सर्व जण पटापटा खाऊं लागलीं. वाडग्यांतला भात डाव्या हातांतल्या कपांत घेऊन तोहि भाज्यापोर्कबरोबर काडयांनीं भराभर तोंडांत घालू लागलीं. तुम्हीहि काडयांनीं खाण्याचा प्रयत्न करा म्हणून गमतीनें मलाहि दोन काडया किंवा चॉप्स्टिक्स् देण्यांत आल्या होत्या. बशींतलें काडयांत येईना, एखादें शीत किंवा पोर्कचा तुकडा आला तर तो तोंडापर्यंत पोहोंचेना. एकदोनदां पोहोंचला तेव्हां प्रो. शिह हंसून 'सक्सेस ! सक्सेस ! ! ' म्हणून ओरडले. काडया तोंडा-ऐवजीं तोंडाबाहेरच फार जाऊं लागल्या आणि पोटांत तर फक्त दोनचार शितें भात आणि गोडया मिरचीचा एखादा तुकडा गेला होता. पांच सहा मिनिटें माझे ते हाल पाहून झाल्यानंतर त्या म्हाताऱ्या चिनी नोकराला, मला कांटे-चमचे आणून द्यायला सांगण्यांत आलें. काडयांनीं खातां आलें नाहीं तें एका अर्थी बरेंच झालें. खातां आलें असतें तरी माझ्यानें खाववलें नसतें. त्या बदकांत किंवा माशांत सर्वजण आपापल्या काडया खुपसून हवा तेवढा तुकडा घेत होते, आणि चांगल्या चवीनें चोखलेल्या त्या उष्टया काडया सर्वजण पुन्हा पुन्हा त्याच बदकांत किंवा माशांत घालीत होते !

कांटा-चमचा आल्याबरोबर भोपळी मिरच्या घातलेली थोडीशी पालेभाजी, थोडासा बदकाचा तुकडा आणि थोडासा मासा मी माझ्या बशींत काढून घेतला. भात आणि पालेभाजीवरच बहुतेक आजची दुपार भागवावी लागणार हें मनाशीं ठरवलेंच होतें. तें नुसतें उकडलेलें बदक, डुकराच्या मांसाचे तुकडे किंवा तो मासा तोंडांत घातला तरी माझ्या घशाखालीं उतरणार नाहीं या-बद्दल माझी खात्री होती, पण इतक्या प्रेमळपणें माझें आदरातिथ्य करणाऱ्या त्या भल्या चिनी मित्रांना मी सर्व कांहीं खात आहें असें मला दाखवायचें होतें. म्हणूनच ते तुकडे मीं बशींत घेतले होते; आणि मधूनमधून तोंडांत घालून चोथा करून माशांतल्या काटयांबरोबर ते मी बशींत एका बाजूला टाकीत होतों. या जेवणांत पावाचे तुकडे, लोणी वगैरे कांहीं नव्हतें. पण एक फार चवदार पदार्थ होता. तो म्हणजे कच्च्या कलिंगडाचा सुर्वा किंवा 'सूप'

एका मोठ्या थोरल्या चिनी मातीच्या वाडग्यांत तें गरमगरम 'सूप' होतें. त्यांत कलिंगडाचे तुकडे, आणि उंसाच्या चावलेल्या चोथ्यासारख्या दिसणाऱ्या सोयाबीनच्या पांढरट साली तरंगत होत्या. वाढून घेण्याकरितां वाडग्यांत एक डावहि होता. भातांत पालेभाजी घालून, तो शक्य तितका मटकावला आणि हें गरमागरम 'सूप' त्यावर भरपूर प्यालों.

## जुनें हॉंगकॉंग कीं परळ-लालबाग ?

जेवणानंतर गप्पा करीत असतां मला नाटकांची विशेष आवड आहे हें प्रो. शिह्ना कळलें तेव्हां 'हॉंगकॉंगमध्यें एक चांगली चिनी नाटक मंडळी, एक फार लोकप्रिय झालेलें संगीत चिनी नाटक सध्यां करीत असल्याचें त्यांनीं सांगितलें. 'आज रात्रीं येतां तर चला', ते म्हणाले. मादाम शिह्नांहि नाटक पाहण्याची इच्छा होती. या नाटकाला फार गर्दी असते, तिकिटें मिळत नाहींत, तिकिटांचा काळा बाजारहि चालला आहे,—तेव्हां काय करायचें असें म्हणत त्या म्हाताऱ्या चिनी नोकराशीं ते कांहींतरी बोलले. तो डोळे मिचकावून हंसला, आणि आत्तां तिकिटें आणून देतों म्हणून पैसे घेऊन बाहेर पडला. अर्ध्या तासांत पहिल्या रांगेंतल्या मधल्या खुर्च्यांची तीन तिकिटें घेऊन तो आला, आणि हंसत हंसत तीं धन्याच्या हातावर त्यानें ठेवलीं. 'आमचा हा म्हातारा फार हुशार आहे,' शिह्न म्हणाले.

आज दुपारीं साडेतीन वाजतां एअर इंडियाच्या ऑफिसांत श्री. बंबा-वाल्यांना भेटावयाचें होतें. न्यू इंडिया इन्शुरन्स कंपनीचे मॅनेजर श्री. नानावटी यांची मोटर घेऊन आज ते सर्व जुनें नवें हॉंगकॉंग आम्हांला दाखवणार होते. बोटीवर जेवण करून पुन्हा रात्रीं ८ च्या सुमारास नाटक पाहाण्याकरितां प्रो. शिह्च्या घरीं यायचें होतें. तेव्हां शिह् कुटुंबाचा निरोप घेऊन दुपारीं अडीचला मी बोटीवर परत आलों.

साडेतीनला एअर इंडियाच्या ऑफिसांत गेलों तेव्हां बंबावाले आलेच होते. 'हॉंगकॉंग अॅन्ड शांघाय बॅंके'च्या उंच इमारतीकडे आम्हीं नजर वळवली तों तिच्यापेक्षांहि गगनचुंबी अशी एक नवी कोरी आधुनिक इमारत दिसली. बंबावाले म्हणाले, ही चिनी सरकारनें बांधलेली 'बॅंक ऑफ चायना'; ही ब्रिटिशांच्या या बॅंकेपेक्षां वीस फूट अधिक उंच त्यांनीं मुद्दामच बांधली !

जुन्या हाँगकाँगच्या रस्त्यांवरून फिरत असतां मुंबईतल्या परळ-लालबागेंतल्या-सारख्या जुनाट, धुरकट इमारती बऱ्याच दिसल्या. एका रस्त्याचें नांव होतें 'वान्-चाय स्ट्रीट.' हाँगकाँगच्या चिनीपणाची खात्री पटवणारीं दृश्यें सर्वत्र दिसत होतीं. दुकानांसमोरच्या पिवळ्या किंवा पांढऱ्या खांबांवर एकाखालीं एक चितारलेलीं काळीं चिनी अक्षरें, रस्त्यावर दिसणाऱ्या तुकतुकीत काळ्या कपड्यांतल्या चिनी स्त्री-पुरुषांच्या झुंडी, इमारतींच्या वरच्या मजल्यावरल्या खिडक्यांतून काठ्या बाहेर काढून त्यांवर गुढ्या उभारल्या-प्रमाणें सुकत घातलेले कपडे, सुक्या मासळीच्या दुकानांच्या दारावर तोरणा-सारखे टांगलेले हात हात लांब सुके मासे—सर्व कांही अगदीं चिनी होतें.

### *हाँगकाँगच्या दऱ्या आणि उपसागर*

तिथून आम्हीं नव्या हाँगकाँगकडे मोर्चा वळवला. डोंगरांच्या रांगा, त्यांत लाल, पिवळ्या मातीच्या कडेकपारी फोडून बांधलेले सुदर बंगले, गर्द हिरव्या झाडीनें भरलेलीं दरींखोरीं, पोहण्याची, खेळण्याबागडण्याची सोय असलेले जुहू, लिडो, रिव्हिएरासारखे समुद्रकांठ, छोटीमोठीं आलिशान हॉटेलें यांनीं डंवरलेलें हें हाँगकाँग आहे. मुबईत ज्या साखरेच्या चौकोनांचीं पाकिटें मिळतात ती मोठी थोरली 'टायकू शुगर फॅक्टरी' वाटेंत दिसली. टायकू कामगारांकरितां बांधलेल्या लाल विटांच्या टुमदार घरांच्या रांगा पलीकडे दिसत होत्या. एंपायर थिएटरच्या दर्शनी भागावर सुंदर शिल्पकाम केलें आहे; आणि छपरावर रंगीबेरंगी निऑन प्रकाशाच्या कमानींवर कमानी आहेत. हाँगकाँगचा हा निसर्गरमणीय भाग इंग्लंडसारखा दिसण्याची ब्रिटिश मालकांनीं भरपूर खटपट केली आहे. टेकड्या, हिरवळ, त्यांतून सुंदर डांबरी रस्ते, टुमदार लाल हिरव्या छपरांचे इंग्लिश बंगले, हें सर्व आहेच; पण इंग्लंडचा परिपूर्ण भास व्हावा म्हणून कांहीं डोंगरकड्यांना पांढरा चुना फांसून त्यांना 'डोव्हर-क्लिफ्स्' असें नांवहि त्यांनीं दिलें आहे! हाँगकाँगचा हा भाग म्हणजे आठदहा हिरव्या डोंगरदऱ्या आणि पांचसहा चिमुकल्या निळ्या उपसागरांचें नंदन-वन आहे.

डोंगरावरून आमची मोटर खालीं येत होती तेव्हां बारीक झुरुझुरु पाऊस पडत होता. रेशमासारखी मऊ पिवळी-पांढरी वाळू असलेल्या 'शेको बीच्'

वर आम्ही थोडा वेळ थांबलों आणि तेथल्या 'डेरीफार्म रेस्टोरां' मध्यें समोरच्या निळ्या समुद्राची गंमत पाहात चहा घेतला. पोहण्याकरितां तिथें येणाऱ्यांकरितां एका बाजूला रंगीबेरंगी चट्ट्यापट्ट्यांच्या कापडाच्या तंबूंची रांग दिसत होती.

साऱ्या हाँगकाँगला पाणीपुरवठा करणारें 'तायताम् रिझर्व्हायर' पाहून तांबड्या छपराचा एक लहानसा तुरुंग आणि छोटीं छोटीं इंग्लिश नमुन्याचीं घरें असलेल्या स्टॅन्ले व्हिलेजमध्यें आम्ही गेलों. गेल्या महायुद्धांत जपान्यांनीं हाँगकाँग घेतलें तेव्हां हाँगकाँगला पाणीपुरवठा करणारें 'तायताम्' त्यांनीं घेतलें; आणि स्टॅन्ले व्हिलेजमध्येंच कैद केलेल्या ब्रिटिशांना डांबून ठेवलें होतें. तिथून 'रिपल्स बे' कडे गेलों. इथली उंच मनोरा असलेली 'लिडो हॉटेल' ची इमारत सुंदर आहे. इथला समुद्रकिनाराहि रमणीय आहे. समोर समुद्रांत तीन टेकड्या दिसतात. त्यांना 'तीन शिपाई' (थ्री सेन्ट्रीज) असें नांव आहे म्हणतात. सुंदर तांबड्या रंगाच्या दगडाची फरशी असलेल्या गच्चीवर समोर दिसणाऱ्या समुद्राच्या लाटांचें नर्तन पाहात पाहात स्त्रीपुरुषांनीं बॉलनृत्य करण्याची सोय आहे. हॉटेलच्या आसपास डोलणाऱ्या छोट्या तालवृक्षांनीं आच्छादलेले छोटे रस्ते आणि रंगीबेरंगी फुलांची बाग आहे. या हॉटेलांत पापड-कुर्डयांसारख्या दिसणाऱ्या कसल्या तरी कुरकुरीत काचऱ्या आम्हीं खायला घेतल्या. त्या म्हणे गंधासारख्या वाटून आणि सुकवून तळलेल्या माशाच्या मांसाच्या होत्या !

## तरंगतीं हॉटेलें

शेवटीं 'ॲबर्डीन' नांवाच्या छोट्याशा कोळीगांवाकडे गेलों. इथल्या समुद्रावर किती तरी चिनी होड्यांचे किंवा 'सांपन'चे तांडेच्या तांडे इतस्ततः तरंगतांना दिसत होते. मोठमोठीं जाळीं लोंबत असलेल्या होड्याहि पुष्कळ दिसल्या. ॲबर्डीनला नेहेमींच पुष्कळ प्रवासी आणि गुलहौशी चिनी, इंग्रज तरुण-तरुणी येतात. इथलें विशेष आकर्षण म्हणजे समुद्रावरलीं तरंगतीं हॉटेलें. काश्मीरमधल्या हाऊसबोटीसारखीं मजले असलेलीं आणि सुंदर शृंगारलेलीं हीं हॉटेलें असतात. 'यूले ताई' या ठळक अक्षरांतल्या नांवाची पाटी असलेली एक बोट आपले दिवे लुकलुकवीत समोरच पाण्यावर डुलत असलेली आम्हांला

दिसत होती. या हॉटेलांत नाना प्रकारचे जिवंत मासे कांचेच्या टाक्यांत फिरत ठेवलेले असतात. आपणांला हवा तो मासा आपण दाखवावा; हॉटेलचा नोकर तो बाहेर काढून तुम्हांला अगदीं ताजा ताजा उकडून किंवा तळून देतो! या विशिष्ट हॉटेलांची ही विशेष गंमत आहे. किनाऱ्यावरून या हॉटेलांपर्यंत पोहोंचविण्याकरितां निळया छपरांचीं छोटीं छोटीं होडकीं घेऊन शेंकडों चिनी मुली गिऱ्हाइकांवर झडप घालण्याकरितां तयारच असतात. आम्हीं मोटार उभी करून किनाऱ्याशीं खालीं पाऊल टाकल्याबरोबर 'माझ्या होडींत या-माझ्या होडींत या!' अशा अर्थाची चिनी किलबिल करीत अक्षरशः त्या पोरी आम्हां तिघाचौघांवर तुटून पडल्या! आम्हांला हॉटेलांत जायचें नव्हतें; पण त्या मुळींच ऐकेनात. बखोटीला धरून त्या आमची ओढाताण करूं लागल्या. बाकीचे कसेबसे निसटले; पण माझ्या दंडाला एक पोरगी बिलगली ती झटकतां झटकली जाईना! कसाबसा सुटलों आणि मोटरींत जाऊन बसलों. सर्वच प्रवाशांवर त्या अशा तुटून पडतात. हंसऱ्या चेहेऱ्याच्या त्या तरुण पोरी असल्यामुळें तसा म्हणण्यासारखा कुणाला राग येत नाहीं! रात्रीं आठ वाजतां चिनी नाटकाला जायचें होतें. तेव्हां सातच्या सुमारास बोटीवर परत आलों.

## *पॉफिंग थिएटरांत*

नाटक आठला सुरू व्हावयाचें होतें. तेव्हां कपडे बदलून साडेसातच्या सुमारास प्रो. शिहूच्या घरीं गेलों. मादाम शिहू काळया रेशमाचा तंग चाँगसाम घालून नाटकाला जाण्यासाठीं तयारच होऊन राहिल्या होत्या. एक टॅक्सी बोलावून प्रोफेसर, मादाम आणि मी पॉफिंग थिएटरकडे गेलों. थिएटरच्या दाराशीं चिनी स्त्रीपुरुषांची तुफान गर्दी दिसत होती आणि हेल काढून आळसट-पणें उच्चारल्या जाणाऱ्या 'चांगचुंगचिव् चॉव' सारख्या चिनी शब्दांचा गलबला कानांवर येत होता. झकपक इंग्रजी कपडे केलेले चिनी या गर्दींत थोडे होते; बहुतेक तुकतुकीत काळया सदराविजारींतले सामान्य चिनी स्त्रीपुरुषच होते. जुन्या तऱ्हेचें हें साग्रसंगीत पौराणिक नाटक असल्यामुळें कामगारांची खूपच गर्दी दररोज या नाटकाला लोटते म्हणे. पॉफिंग थिएटरची इमारत जुनी पण भव्य आहे. मुंबईंतल्या भांगवाडी थिएटरची मला आठवण

झाली. लग्नसमारंभ असला कीं लाल सोनेरी काळ्या रंगाचें भलें थोरलें पांचसहा फूट लांबीरुंदीचें बाशिंगासारखें कांहींतरी झगझगीत चिनी लोक घराच्या दारावर बांधतात. तसलेंच अजस्र बाशिंग थिएटरच्या दरवाजावरहि दिसत होतें! दरवाजाच्या आसपास खांद्यावरल्या कावडींतून शेंगा, चणे, जांभळासारखीं कसलीं तरी फळें वगैरे चिनी फेरीवाले विकीत होते. नाटक चालूं असतांनासुद्धां गळ्यांत पेट्या अडकवलेल्या चिनी बाया आणि पुरुष आग्रह करकरून सुका मेवा, मासे, मटनाचे सुके पदार्थ वगैरे विकीत मधूनमधून फिरत होते, आणि प्रेक्षकहि नाटक पाहतांना हा कांहीं व्यत्यय आहे असें न समजतां हवें तें विकत घेऊन भरपूर खातपीत होते! खाणाऱ्या-पिणाऱ्यांना पदार्थांची बशी किंवा पेयाचा प्याला ठेवतां यावा म्हणून थिएटर-वाल्यांनींहि मागल्या खुर्चीवरल्यांसाठीं पुढल्या खुर्चीच्या पाठीला एक फळी लावलेली दिसली! आम्ही पहिल्याच रांगेंत असल्यामुळें रंगमंचाच्या अगदीं जवळ होतों. चिनी नाटकाचा सर्वच कारभार एकंदरींत आरामशीर असतो असें दिसतें. आमच्या डावीकडे रंगमंचावर विंगला लागून सर्व प्रेक्षकांना दिसेल अशा कोपऱ्यांत नाटकांतल्या संगीताची साथ करणारे वाद्यवादक बसले होते. नाटक पौराणिक किंवा कल्पनारम्य प्राचीन काळांतल्या वातावरणाचें होतें; त्यामुळें पांढऱ्या शर्टपॅन्टमधल्या व्हायोलिन, सॅक्सोफोन वगैरे पाश्चिमात्य वाद्यें घेऊन बसलेल्या, मधूनमधून सिगारेट फुंकीत, चहा पीत असलेल्या, आणि स्टेजवरल्या रिकाम्या नटनटींशीं डोळे मिचकावून हंसणाऱ्या खिदळणाऱ्या कोपऱ्यांतल्या त्या लोकांना पाहून कसेंसेंच वाटत होतें!

## *‘ मृत हंस सप्टेंबरांत परत येतो ’*

कडकडा ताशे झडल्याचा आणि तुताऱ्या फुंकल्या गेल्याचा आवाज झाला आणि आठ वाजून वीस मिनिटांनीं दर्शनी पडदा वर गेला. स्टेजवर गुजराथी नाटकांत असते तशी डोळे दिपवणारी झगझगीत प्रकाशयोजना होती. एका बाजूला खिडक्यादरवाजे वगैरे रंगवलेले होते, तर दुसऱ्या बाजूला पानें झडलेलें एक चेरीचें झाड आणि एक वेली लोंबत असलेला मोठा थोरला वृक्ष उभा केलेला होता. पात्रें घरांत बोलतांना डाव्या बाजूला उभीं राहून किंवा बसून बोलत; बाहेर बागेंत बोलणारीं पात्रें उजव्या बाजूच्या वृक्षाखालीं किंवा

चेरी झाडाजवळ बोलत. घर आणि बागेच्या मध्यें कसलाच आडपडदा किंवा मागेंपुढें कांहींच नव्हतें. दिवाणखाना आणि बाग एकाच ठिकाणीं होतीं; तीं वेगळीं आहेत, मागेंपुढें आहेत, दिवाणखान्याच्याच एका कोंपऱ्यांत वृक्ष वगैरे उगवलेले नाहींत, हें सर्व प्रेक्षकांनीं आपल्या कल्पनेनें जाणायचें ! दिवाणखान्याच्या मध्यें दोन तांबड्या लाल कापडाच्या खुर्च्या आणि लाल रंगाचेंच एक जुनाट टेबल होतें. चिनी भाषेंतलें नाटकासंबंधींचें एक हॅन्डबिल दरवाजावर मला मिळालें होतें. तें दाखवून नाटकाचें नांव काय म्हणून मी मादाम शिह्ना विचारलें. चिनी भापा चित्रलिपीत लिहिलेली असते त्यामुळें उच्चारानें अर्थ समजत नाहीं, तर चित्र पाहून कांहीं तरी अर्थ वाचणाराच्या मनांत उतरतो असें मला वाटतें. मादाम म्हणाल्या, नाटकाचें नांव 'मृत हंस नवव्या महिन्यांत परतून येतो,' असें असावें–कदाचित् 'मार्च-सप्टेंबरांत परतून येतो,' असेंहि असेल !

## नाटक सुरू

नाटक सुरू झालें. मादाम किंवा प्रोफेसर शिह्ना मी मधूनमधून विचारीत होतों; पण भाषा मुळीच समजत नसल्यामुळें कपडेलत्ते, हावभाव आणि मादामनीं अधूनमधून दिलेल्या सूचना यांच्या आधारानें माझ्या डोळ्यांवर आणि कानांवर जे कांहीं संस्कार झाले ते सांगण्याचा प्रयत्न करतों. दर्शनी पडदा वर गेला तेव्हां एक साधा प्रवेशाचा पडदा आणि समोर एक मायक्रोफोन उभा असलेला दिसला. चिनी स्त्रीसारखा दिसणारा––ज्याच्या भादरलेल्या मिशांचा हिरवेपणा स्पष्ट दिसत होता––एक म्हातारा हिजडा ठुमकत ठुमकत मायक्रोफोनजवळ आला आणि 'धा थिक्था' च्या तालावर आपल्याकडला कथ्थक नाच्या जसे बोल म्हणतो तसा एक स्वगत बोलूं लागला. तें स्वगत नव्हतें. आपण कोण, आतां काय होणार वगैरे कथानकाचे धागे तो सांगत होता. घरांतली ती म्हातारी मोलकरीण किंवा दासी होती. असलीं कामें पुरुषनटांनाच देण्यांत येतात म्हणे ! त्याचें–चुकलों,–तिचें बोलणें संपल्यावर मागला पडदा वर गेला, आणि तें घर, चेरी झाड, लाल टेबल-खुर्च्यांचा देखावा डोळ्यांसमोर आला.

## शिंग वाय् उंग वाँग !

झगझगीत रुपेरी झग्यांतली, मेणाच्या रेखीव बाहुलीसारखी सुंदर दिसणारी नायिका वेलीसारखी लवलवत रंगभूमीवर आली. तिची रंगभूषा मासलेवाईक होती. दोन्ही भुंवया दोन टोंकांना वर घेतल्यामुळें कपाळाचा गोरापान त्रिकोण झाला होता. नाक आणि कपाळ गोरें गोरें तर निमुळत्या हनुवटीपर्यंत गाल तांबडेलाल रंगवले होते. कथाकली नृत्यनाटचांतल्या पात्राप्रमाणें ती कळसूत्री बाहुलीसारखीच चालत बोलत होती. मला वाटतें तीं संगीतांतच बोलत होती; कारण तिच्या तोंडांतून बाहेर पडणाऱ्या प्रत्येक चरणाला कोंपऱ्यांतलें वाद्य वाजवणारे संगीताची साथ देत होते. एखादा जोरदार चरण सुरू होण्यापूर्वीं किंवा एखादा जोरदार चरण संपल्यावर पोरें जस्ताचे डबे बडवून जसे 'ताड् ताड् तडम् तडम्' असे कानठळ्या बसवणारे आवाज काढतात तसे आवाज संगीताचे साथीदार काढायचे. 'शिग् वाय, उंग वाँग, मांय् कुटु लिग सांग' असलें कांहीं तरी तें नायिकेचें भाषण किंवा गाणें संपलें आणि तरुण नायकानें प्रवेश केला. नायक मॅन्डारिन चिनी वेषांत--म्हणजे भरजरी पोकळ सदरा आणि तशीच भरजरी पोकळ विजार, डोक्यावर लखलखणारी मध्यें गुंडी असलेली गोल टोपी, आणि हातांत लखलखणारा पंखा--अशा वेषांत कळसूत्री बाहुल्यासारखाच खटक्यांत चालत आला. नायक उंच दिसावा म्हणून कीं काय त्याच्या पादत्राणांना चांगला दोन अडीच इंच उंचीचा रबरी प्लॅटफॉर्म लावलेला दिसला !

## चिनी गणपतराव बोडस ?

मादाम म्हणाल्या, 'नायक राजघराण्यांतला आहे.' ती रुपेरी झग्यांतील नायिका सामान्य घराण्यांतली होती. नायकानें कांहीं तरी भाषण केल्यावर ती नायिका वेलीसारखी डुलत बाहेर आली होती तशीच वेलीसारखी आंत गेली. ती आंत जातांना संगीतवादकांनीं काठ्यांनीं भांडीं झोडपावीं तसा प्रचंड दणदणाट केला. तो तिच्या निष्क्रमणासाठीं होता कीं दुसऱ्या नायिकेच्या प्रवेशासाठीं होता कुणास ठाऊक; कारण तितक्यांत झगझगीत निळ्या झग्यांतली एक सुंदर नायिका रंगभूमीवर डुलत आली; आणि नायकाशीं कथाकली हालचालींत चिनी प्रणयालाप करूं लागली. ती म्हणे चिनी सम्राटाच्या

रखेलीची पुतणी. तुझ्यासारख्या राजघराण्यांतल्या कुमारानें त्या रुपेरी झग्यांतल्या सामान्य कुळांतल्या तरुणीच्या प्रेमांत पडावें हें बरोबर नाहीं, अशा अर्थाची ती नायकाची निर्भर्त्सना करूं लागली. नायक संतापत होता. मधूनमधून निळी नायिका खिन्न होत होती. इतक्यांत शेक्स्पियरच्या फॉल्स्टॉफ्-सारखा दिसणारा नायकाचा लठ्ठ गमत्या बाप येतो. त्याचा चेहरा अगदीं साधा रंगवलेला होता; पण त्याचे कपडे मजेदार होते. फुलांचा कशिदा असलेली सफेत रेशमी कापडाची तंग सुरवार त्यानें घातली होती. तीवर सफेत रेशमी सदरा; आणि त्यावर रुपेरी, सोनेरी काम केलेलें झगझगीत कुडतें. मुकुटा-सारखी लखलखणारी टोपी त्याच्या डोक्यावर होती. त्याच्या कुडत्याच्या छातीवर जरतारी कोंबडा होता! तो यायच्या आधीं रुपेरी नायिकाहि आलेलीच होती. म्हाताऱ्याला निळी नायिका कांहीं तरी सांगून भडकवते. तो नायकाला टाकून बोलू लागतो. तितक्यांत तो रुपेरी नायिकेला पाहातो. तो खूष होतो. 'हिच्यावर आपण रागावूंच शकत नाहीं' म्हणतो. ती चहाचा पेला आणते. गुडघे टेकून त्याला देऊं लागते. 'तिच्याकडून त्यानें चहाचा पेला घेतला तर आपली सून म्हणून त्यानें तिचा स्वीकार केला असें समजायचें,' मादाम म्हणाल्या. चहा नको म्हणून तो खुर्चीवरून उठतो आणि मुलाशीं कांहीं तरी बोलू लागतो. खूप गंभीर बोलतो, आणि सबंध थिएटरांत हास्याचे कल्लोळ उठतात असें विनोदीहि डोळे मिचकावून बोलतो. मला वाटतें तो संगीतांत बोलत होता; कारण मधूनमधून तो बारीकशा ताना मारीत होता. भाषा समजत नव्हती, पण बापाचें काम करणाऱ्या या नटाची एकंदर चलाखी आणि डोळ्यांची फिरत इतकी सफाईदार होती, कीं मला क्षणोक्षणीं आमच्या गणपतराव बोडसांची आठवण होत होती. प्रेक्षक तर या नटावर बेहद्द खूष होते. अर्थात् तें योग्यच होतें. नायक, दोन नायिका यांचाहि अभिनय सांकेतिक पद्धतीचा असला तरी परिणामकारक आणि आकर्षक होता. भाषा समजत नव्हती पण कंटाळा येत नव्हता. नाटकाची लय चांगली होती.

## व्हायोलिनचें क्यांव् क्यांव्

चहा नाकारून बाप नायकाशीं बोलूं लागला तेव्हां रुपेरी नायिका आंत गेली, आणि हिरव्या रेशमाच्या सदरा-तुमानींतल्या आणि लाल कुंचड्यांतल्या,

गुबगुबीत बालकाला पोटाशीं धरून बाहेर घेऊन आली. नायकाशीं तिचें लग्न होऊन तिला मूलहि झालें होतें. आम्हांला हें कांहींच माहीत नव्हतें. तें मूल अर्थात् मोठी थोरली बाहुली होती. पण लांबून खऱ्या मुलासारखें दिसत होतें आणि वाटतहि होतें. कारण मधूनमधून नायिका मुलाला 'उगी उगी' करायची, आणि कोपऱ्यांतले संगीतवादक आपल्या व्हायोलिनवर मुलाच्या रडण्यासारखा हुबेहूब 'क्यांव्---क्यांव्---' असा आवाज काढायचे ! नातवाला पाहिल्याबरोबर म्हातारा खूष होतो, आणि सुनेला 'एकच नातू'? म्हणून डोळे मिचकावून विचारतो ! नातवाला जवळ घेऊन त्याचे मुके घेतो. 'पहिला नातू दिसला कीं चिनी आजोबा फार खूष होतात,' मादाम म्हणाल्या. निळी नायिका चिडून म्हाताऱ्याला अद्वातद्वा बोलूं लागते. तेव्हां म्हातारा तिला म्हणतो, 'तूं आतां याची मावशी हो ! ' प्रेक्षकांत खूप हंशा पिकतो. म्हाताऱ्या-खेरीज रंगभूमीवरून सर्व निघून जातात; आणि म्हातारा अंकाच्या सुरु-वातीला ती म्हातारी दासी म्हणते तशाप्रकारचें एक तालबद्ध स्वगत बारीक-बारीक ताना मारीत संगीताच्या साथींत प्रेक्षकांना उद्देशून म्हणतो. इथें पहिल्या अंकाचा पडदा पडतो. नेहमींचा दर्शनी पडदा नाहीं. एक निळ्या रंगाचा पडदा पडला, त्याच्यावर कांहीं अक्षरें होतीं. मादाम म्हणाल्या, नायिकेचें काम करणाऱ्या नटीच्या अभिनयावर खूष होऊन प्रेक्षकांनीं हा पडदा बहाल केलेला आहे. असे अनेक पडदे कंपनीजवळ आहेत.

### *बादशहाच्या हुकुमानें सेनापतींचें लग्न*

दुसरा अंक सुरू. चीनच्या बादशहाचा हा राजवाडा आहे. राजवाड्याच्या मधल्या दरवाजाच्या दोन बाजूंना दोन मुंडन केल्यासारखे दिसणारे चिनी सिंह दिसतात. दरवाजावरल्या कमानीच्या मध्य भागीं आपल्याकडल्या कमानीवर जशी गणेशमूर्ति असते तसे इथें दोन कावळे आहेत ! काळीं अक्षरें असलेले लाल चौकोन टोकांशीं लटकवलेल्या दोन उंच काठ्या राजवाड्याच्या दरवाजाशीं आहेत. 'आवाज करूं नका' असें कांहीं तरी त्या चौकोनांवर लिहिलेलें आहे म्हणे. तांबड्या, काळ्या, सोनेरी रंगांचे चिनी आकाशदिवे राजवाड्यांत ठिकठिकाणीं टांगलेले दिसले. मात्र मध्यें दिसणाऱ्या जुनाट लाल टेबलखुर्च्या पहिल्या अंकांतल्याच होत्या ! पडदा वर गेल्याबरोबर

लांब कानाच्या चित्रविचित्र टोप्या घातलेले बादशहाचे चार दरबारी प्रवेश करतात. त्यांच्या मागून आमच्याकडल्या 'मानापमान' किंवा 'पुण्यप्रभाव' नाटकांतल्या शिपाई-प्याद्यांसारखे रंगीबेरंगी चट्टयापट्टयांच्या कपडयांतले शिपाई येतात. बादशहा प्रवेश करतो. त्याचे केंस पांढरे शुभ्र आहेत. चमकणारे रुपेरी खवले असलेला पांढऱ्या रेशमाचा त्याचा वेष आहे. त्याच्या मागें लांब दांडयाच्या ताडपत्री पंख्यासारखे दिसणारे लाल रंगाचे अबदागीर धरून दोन मुलगे फिरतात. शंकराचार्यांच्या भगवें फडकें बांधलेल्या काठी-सारखा दिसणारा एक लांबच लांब, पण किरकोळ राजदंड बादशहाच्या हातांत आहे. रंगभूमीवर तडतडाट, झणझणाट होतो आणि उदयशंकरच्या तांडव नृत्यांतल्या शंकरासारखीं पावलें टाकीत बादशहाचा सेनापति प्रवेश करतो. रुपेरी आणि पांढऱ्या रंगांचे पट्टे असलेल्या लांबलचक म्यानांत त्याची भली मोठी तलवार आहे. बादशहाच्या रखेलीची पुतणी असलेली ती निळी नायिका प्रवेश करते, आणि पहिल्या अंकांतल्या नायकाविरुद्ध बादशहाकडे तक्रार करूं लागते. इतक्यांत तिचें लक्ष सेनापतीकडे जातें; आणि ती त्याच्या प्रेमांत पडते. सेनापति आश्चर्यचकित होतो आणि संतापतो. आपल्या रखेलीच्या पुतणीशीं,-त्या झगझगीत निळया कपडयांतल्या नायिकेशीं तूं लग्न केलेंच पाहिजेस, असा सेनापतीला बादशहा हुकूम करतो. झालें. तिथेंच लग्नविधि सुरू! निळी नायिका सोनेरी जरतारीचें एक कापड आणि लाल किनारीचा एक लांबलचक रेशमी गळपट्टा घेऊन येते. सेनापति कपाळावर हात मारून म्हणतो, 'हा माझा लग्नविधि नसून अंत्यविधि आहे!' पण कांहीं वळत नाहीं. व्हायचें तें होतें. पिंपाच्या भोंवतीं पट्टया असतात तशा आडव्या लाल पट्टयांचे सफेत कपडे घातलेले दरबारी वधूवरांच्या भोंवतीं उभे राहतात. मोठमोठीं भांडीं खणाणून बडवल्याचे आणि कर्कश तुताऱ्यांचे कानठळया बसवून टाकणारे आवाज होतात; आणि सेनापतीचें निळया नायिकेशीं लग्न होतें!

## *धिक् तांच तंच मदनंच*

तिसऱ्या अंकांत पहिल्या अंकांतल्या नायकाचा म्हातारा बाप नातवाला मांडीवर घेऊन आपल्या घरांत बसलेला दिसतो. चिनी मुलाच्या जीवनांतला शंभरावा दिवस पहिल्या वाढदिवसापेक्षां महत्त्वाचा समजतात. म्हाताऱ्याच्या

नातवाचा शंभरावा दिवस आहे. समोर एक लांबलचक लाल रंगाचा चौकोनी फडका आहे. त्यावर कांहीं अक्षरें आहेत. आज पूर्वजपूजा करायची म्हणून तो फडका लावलेला आहे. म्हातारा नातवाला घेऊन बसला आहे. तिथें लाल टेबलावर दोन मेणबत्त्या आणि बशींत दोनतीन सफरचंदें आहेत. मुलाचा बाप—म्हणजे नायक तिथें येऊन उभा राहतो. म्हातारा नातवाला घेऊन पूर्वजांपुढें गुडघे टेकतो. इतक्यांत निळ्या नायिकेशीं लग्न झालेला सम्राटाचा सेनापति तलवार परजीत तिथें येतो. नायकानें आपल्या रखेलीच्या पुतणीला नकार दिला म्हणून रागावून या सर्व कुटुंबाचा शिरच्छेद करण्याचा हुकूम सम्राटानें सेनापतीला दिला आहे! सेनापतीबरोबर दोनचार शिपाईहि आहेत. चिनी रंगभूमीवरल्या संकेताप्रमाणें सेनापति आणि त्याचे शिपाई तिथें उभे असून म्हाताऱ्याला किंवा नायकाला दिसत नाहींत; कारण मध्यें एक दरवाजा आहे अशी कल्पना करायची. नायक वळतो आणि दरवाजाच्या बाहेर आल्याचा अभिनय करतो तेव्हां त्याला सेनापति आणि त्याचे शिपाई दिसतात. सेनापति त्याचा बालपणचा मित्रच आहे. फार काय, ज्या रुपेरी नायिकेशीं त्यानें लग्न केलें आहे तिच्यावर तिचें लग्न होण्यापूर्वीं सेनापतीचें प्रेम होतें. ते एकमेकांना पाहतात. काय करावें तें सेनापतीला समजत नाहीं. तो किंकर्तव्यमूढ होतो.

## भाषण करून दमलेल्या नटाला रंगभूमीवर चहा

आजोबांच्या खांद्यावर नातू रडूं लागतो– म्हणजे कोपऱ्यांतले संगीतवादक व्हायोलिनवर 'क्यांव् क्यांव्' आवाज काढूं लागतात! आजोबा पुढें होऊन कांहीं तरी विनोदी बोलतो; आणि नातवाला सेनापतीच्या हातांत देतो. सेनापतीच्या अंत:करणांत कालवाकालव होते. सम्राटाचा आदेश पाळावयाचा नाहीं असा निश्चय करून सेनापति आपलीं झगझगणारीं सेनापतीचीं वस्त्रें ओरबाडून काढतो, आणि फेकून देतो. त्याच्या अंगावर फक्त एक साधा पांढरा सदरा आणि विजार राहते. इतक्यांत साध्या पांढऱ्याच वेषांत मुलाची आई, म्हणजे रुपेरी नायिका तिथें येते. मुलाचा बाप आंत गेलेला असतो. नायिकेचा सेनापतीवर विश्वास बसत नाहीं. 'माझ्यावरल्या तुझ्या प्रेमाचें द्वेषांत रूपान्तर झालें आहे,' ती सेनापतीला म्हणते. एक

लांबलचक भाषण करून सेनापति तिला टाकून बोलत असतो, इतक्यांत नायक म्हणजे तिचा नवरा तिथें येतो. सेनापति तलवारीनें त्याच्या दंडावर वार करतो. नायिका बेशुद्ध होऊन पडते. लांबलचक भाषण करून थकलेला सेनापति रंगभूमीच्या मागें जाऊन प्रेक्षकांकडे पाठ करून उभा राहतो. तो श्वास घेत असतो. रंगपटांतला किंवा कपडेपटांतला एक लांडी विजार, गंजिफ्रॉक घातलेला नोकर सेनापतीला चहाचा कप आणून देतो. प्रेक्षकांकडे पाठ करून सेनापति तो खुशाल पिऊन टाकतो. संकेत सर्व प्रेक्षकांना मान्य असल्यामुळें या गोष्टीचें त्यांना कांहींच वाटत नाहीं ! इतक्यांत सेनापतीची बायको, म्हणजे ती निळी नायिका तिथें येते. तिचें आणि सेनापतीचें भांडण होतें. सेनापति तांडवनृत्यच करतो म्हणा ना ! तो तिचा गळा दाबतो आणि ती धाडकन् मरून पडते. मृत माणसाचा अभिनय करणाऱ्या नटीला त्रास होऊं नये म्हणून सेनापतीला चहा आणून देणाऱ्या नोकरासारखाच एक लांडी विजार, गंजिफ्रॉक घातलेला नोकर एक उशी घेऊन रंगभूमीवर धांवत येतो आणि मेलेल्या निळ्या नायिकेच्या मानेखालीं ती अलगद ठेवतो. मी पहिल्या रांगेंत असल्यामुळें आपले चिमुकल्या बदामासारखे डोळे हळूच उघडून मेलेली नायिका त्या उशी ठेवणाऱ्या नोकराकडे पाहात असलेली मला दिसली. हाहि संकेत प्रेक्षकांना मान्य असल्यामुळें त्यांना या सर्व प्रकाराचें कांहींच वाटत नव्हतें ! नायकाचीं, नायकाच्या म्हाताऱ्या बापाचीं एकदोन भाषणें झालीं आणि तिसऱ्या अंकाचा पडदा पडला.

## *आतां नाटक डोक्यावरून जाऊं लागलें*

चौथ्या अंकाच्या प्रारंभाला पहिल्या अंकाच्या प्रारंभीं आलेली हिजड्या-सारखी दिसणारी ती दासी आली आणि तिनें एक लांबलचक तालबद्ध भाषण केलें. मला वाटतें, उशिरां येणाऱ्यांसाठीं आतांपर्यंत झालेल्या तीन अंकांत काय झालें तें तिनें सांगितलें असावें. आतां मात्र कथानक माझ्या डोक्यावरून जाऊं लागलें. नायिकेचा मुलगा आतां आठ वर्षांचा झालेला असतो. त्याच्या बापाला म्हणजे नायकाला सम्राटानें घरापासून एक हजार मैल दूर हद्दपार केलेलें असतें. हा हुकूम मोडून तो मुलाला, बायकोला भेटायला परत आला तर त्याला ताबडतोब तीर मारून ठार करायचा हुकूम असतो. दासीचा प्रवेश

झाल्यानंतर तुरुंगासारखा देखावा डोळ्यांसमोर आला. तो आठ वर्षांचा मुलगा सम्राटानें स्थानबद्ध करून ठेवलेला असावा. सम्राटाच्या वाढदिवशीं आई किंवा आजोबा त्याला भेटूं शकत. आज तीं दोघें त्याला भेटायला आलीं होतीं. इतक्यांत निळी नायिका——आपण आतां तिला खलनायिका म्हणूं—— तिथें येते. एकच वेताची काठी सर्व प्रेक्षकांना नीट दिसणार नाहीं म्हणून मारायला येणाराच्या हातीं चारपांच वेताच्या काठ्या एकत्र बांधून त्याचा जुडगा देण्याचा चिनी रंगभूमीचा संकेत असावा. खलनायिका झाडूसारखा दिसणारा असा एक जाडजूड जुडगा घेऊन त्या मुलाला मारझोड करायला येते. (गळा दाबून तिसऱ्या अंकाच्या शेवटीं तिच्या नवऱ्यानें म्हणजे सेनापतीनें तिला ठार केलें होतें त्याचें काय झालें ?—कीं गळा दाबून तिला नुसतें बेशुद्ध केलें होतें आणि मी ती मेली असें समजलों ? जाऊं द्या, फार विचार करण्यांत अर्थ नाहीं !) म्हातारा आजोबा खलनायिकेशीं डोळे मिचकावीत गमतीनें बोलत असतो. इतक्यांत सेनापति तिथें येतो. ही सर्व मंडळी आपसांत बोलत असतां हजार मैल दूर हद्दपार केलेला नायक भिकाऱ्याच्या वेषांत येतो. त्याला पहिल्यांदा कुणी ओळखीत नाहीं ! पण म्हाताऱ्याला त्याची ओळख पटते. त्यासरशीं नायकाला इतका आनंद होतो कीं, एका आठ वर्षांच्या मुलाचा बाप असलेला तो प्रौढ पुरुष टुणकन् उडी मारून बापाच्या कडेवर बसतो आणि त्याच्या गळ्याला मिठी मारतो ! बाप त्याला खालीं उतरवतो, आणि संतापून म्हणतो, 'अरे मूर्खा, तूं हुकूम मोडून इथें आला आहेस हें बादशहाला कळलें तर ताबडतोब तिरंदाज धाडून माझ्या पुढ्यांत तो तुझा मुडदा पाडील त्यापेक्षां नदींत उडी मारून जीव दे !' (मादामनीं म्हाताऱ्याच्या भाषणाचा हा इत्यर्थ मला सांगितला हें सांगावयाला नकोच !) इतक्यांत बादशहाचे तिरंदाज तिथें येतातच. ते तीर सोडतात. पण मुलगा निसटून जातो आणि म्हाताऱ्या बापाला तीर लागून तो मरून पडतो. आठ वर्षांचा तो मुलगा स्वतःच्या आईला ओळखत नाहीं. इथें चौथा अंक संपला.

पांचवा अंक अगदींच छोटा होता. तुरुंगाची खोली. साखळदंडांनीं हातपाय जखडलेली मुलाची आई, ती नायिका, कांटेरी शय्येवर पडलेली होती. लालकाळ्या पट्ट्यांचे कपडे घातलेले दंडुकाधारी पहारेकरी इकडून तिकडे फिरत होते. लाल फुलांच्या माळा घातलेल्या चारुदत्ताला वधस्तंभाकडे नेतात त्या

दृश्याची मला आठवण होत होती. इतक्यांत हजार मैल दूर हद्दपारीची शिक्षा झालेला,——मध्यंतरीं भिकाऱ्याच्या वेषांत आलेला तो नायक चांगल्या झगझगीत रुपेरी वेषांत तिथें येतो. तो कांहीं तरी बोलत होता, इतक्यांत मीं मनगटावरल्या घड्याळांत पाहिलें तों साडेअकरा वाजले होते. कांहीं दुरुस्तीचें काम असल्यामुळें रात्रीं बारा वाजतां बोटीवरले सर्व दिवे जाणार म्हणून नोटीस लावलेली होती. तेव्हां मी जायला उठलों. प्रोफेसर आणि मादाम शिहूचा निरोप घेतला. नाटक केव्हां संपेल म्हणून मीं विचारलें तेव्हां शिहू म्हणाले, त्याचा कांहीं नेम नाहीं; आणखी दीड दोन तास सहज चालेल.

बाहेर येऊन टॅक्सी घेतली आणि बाराच्या आंत बोटीवर माझ्या केबिन-मध्यें येऊन पोहोंचलों.

२ जून १९५५

## *पाचूचीं बेटें*

उद्यां आमची बोट हाँगकाँग सोडणार. प्रातरुपाहार झाल्यानंतर गांवांत गेलों, आणि दुपार होईपर्यंत हाँगकाँगच्या रस्त्यांवरून यथेच्छ भटकलों. दुपारीं बंबावाल्यांनीं शँको नांवाच्या रशियन हॉटेलांत जेवावयाला नेलें. जेवण फारच रुचकर होतें. गेल्या कित्येक दिवसांत इतका साजूक ‘राइस’ आणि इतकी चवदार भाजीपाल्यांची ‘करी’ खाल्ली नव्हती. ‘स्वच्छ आणि रुचकर शाकाहारी जेवण हें या रशियन हॉटेलाचें वैशिष्टच आहे’, बंबावाले म्हणाले.

युनायटेड कमर्शिअल बॅंकेचे इथले पंजाबी मॅनेजर श्री. सरीन हे बंबावाल्यांचे मित्र आहेत. आज संध्याकाळीं ते आपल्या मोटारींतून आम्हांला हाँगकाँगचें ‘पीक्’ हें हाँगकाँग मधल्या डोंगरांचें सर्वात उंच शिखर पाहायला नेणार आहेत. हें १८०० फूट उंच आहे, तिथें मोटारीनें किंवा पिनांगमध्यें आहे तशा ‘रोप रेल्वेनें’ वर जातां येतें.

‘हॅपी व्हॅली’ च्या कड्यावर डोंगर खोदून बांधलेल्या सुंदर घरांपैकीं एकांत श्री. सरीन राहतात. डोंगरांतल्या आठशें फूट उंचीवरल्या या घरांतून समोरची ‘हॅपी व्हॅली’ आणि हाँगकाँग शहराचा देखावा फारच मनोहर दिसतो. सौ. सरीन यांनीं गरम गरम भजीं आणि चिवडा कॉफीबरोबर

खायला दिला. बऱ्याच दिवसांनीं मिळालेलें हें मराठी खाद्य मिटक्या मारीत खाऊन आम्ही व सरीनमंडळी 'पीक' पाहावयाला बाहेर पडलों.

हिरव्यागार झाडींतून 'पीक' कडे जाणारा रेखीव मोटाररस्ता, 'पीक'-वरचें टुमदार हॉटेल, सगळ्या हाँगकाँगचें विहंगदर्शन घेण्याकरितां डोंगराच्या कडेकडेनें केलेला चिमुकला पायरस्ता, तिथून ठिकठिकाणीं दिसणारे हाँग-काँगमधले छोटेछोटे निळेनिळे उपसागर, त्यांना वेढणारे कुठें पिवळसर तर कुठें शुभ्रसफेत चमचमणारे वाळूचे पट्टे,—खरोखरच एखाद्या अद्‌भुतरम्य नंदनवनांत वावरतों आहोंत असें कांहीं क्षण वाटलें. हाँगकाँग आणि सिंगापूर दोन्ही पाचूसारखीं हिरवीगार बेटें आहेत; पण एकाचा प्रातःकाळच्या प्रकाशांत चमचमणाऱ्या पाचूसारखा गवती हिरवा रंग, तर दुसऱ्याचा सायंकाळच्या दाटणाऱ्या छायांतल्या पाचूसारखा काळसर हिरवा रंग.

३ जून १९५५

## *रंगीत कागदी बंध*

आज दुपारीं १२ ला बोट हाँगकाँगहून सिंगापूर, पिनांग, कोलंबो, मुंबई हा प्रवास सुरू करणार. सकाळीं चहानंतर बंदराजवळच्या रस्त्यावरून भटकून अकराच्या सुमारास बोटीवर परत आलों, तेव्हां हाँगकाँगला चढलेल्या नव्या चिनी, हिंदी—विशेषतः सिंधी आणि युरोपियन स्त्रीपुरुष उतारूंची आणि त्यांना पोहोंचवायला आलेल्या मित्रमैत्रिणींची बोटीवर एकच गर्दी उसळली होती. हिंदी, सिंधी, चिनी, इंग्रजी शब्दांचा प्रचंड कलकलाट, फेंसाळणाऱ्या बिअरच्या ग्लासांतून दरवळणारा उग्र दर्प आणि या सर्व ध्वनींना आणि गंधांना एकत्र गुंडाळूं पाहाणारीं सिगारेटच्या धुराचीं तरल वलयें यांनीं सर्व बोट भरून गेली होती. बोट सुटण्याचा कर्कश भोंगा किंचाळला तसे पोहोंचवायला आलेले लोक बोटीच्या जिन्यावरून उतरून खालीं धक्क्यावर जाऊन उभे राहिले, आणि बोटीच्या कठड्यावरून हिरव्या, पिवळ्या, लाल कागदाच्या सुरळ्या प्रवासाला निघणाऱ्यांनीं खालीं सोडल्या. धक्क्यावरल्या ज्याच्या त्याच्या मित्रानें किंवा नातेवाइकानें त्या त्या सुरळीचें टोंक धरून कागदी दुव्यानें शेवटचे स्नेहसंबंध जोडले. एकदोन मिनिटांत बोट थडथड फडफड करून धक्क्याकडून झपाट्यानें दूर जाऊं लागली तसे हे कागदी बंध सुटून किंवा तुटून

हताशपणें बोटीच्या बाजूला गळून पडले.

बोट सुटायच्या आधीं आणखीहि गमती बोटीच्या दुसऱ्या बाजूला चालल्या होत्या. आपलीं लहानलहान होडगीं किंवा सांपन घेऊन होडीवाले चिनी स्त्रीपुरुष उतारूंनीं वरून उडवलेलीं दहा सेंटचीं नाणीं, लांब बांबूंच्या काठीला लावलेल्या छोट्याशा जाळ्यांत अलगद पकडण्याचें कौशल्य दाखवीत होते.

बोट बंदराबाहेर पडली आणि समुद्रानें रुद्रावतार धारण केला. दुपारीं चहाच्या वेळेला तर बोट इतक्या जोरानें हालत होती कीं, एका टेबलावरल्या चहाच्या कपबशा, किटली वगैरे लांब उडवल्या जाऊन त्यांचा चक्काचूर झाला.

चहा पिऊन स्मोकिंग रूममध्ये आम्ही बसलों होतों. कांहीं चिनी आणि इंग्रज बायका समोरच्या कोंपऱ्यांतल्या कोचावर आणि खुर्च्यांवर बसल्या होत्या. एकदम बोट एका बाजूला इतकी कलंडली, की त्यांच्या खुर्च्या , कोच घसरत दुसऱ्या कोंपऱ्यांत गेल्या, आणि त्या बायका एकीवर एक पडून त्यांचा ढीग झाला. त्यांच्या आरडाओरडीनें साऱ्या बोटीची करमणूक झाली !

४ जून १९५५

## *चिनी विद्यार्थी*

हाँगकाँगमधल्या मेडिकल कॉलेजांत शिकणारे सिंगापूर, पिनांगमधले पुष्कळ चिनी विद्यार्थी साडेतीन महिन्यांची सुट्टी सुरू झाल्यामुळें आमच्या बोटीवरून घरीं जात आहेत. सकाळच्या चहानंतर डेकवर गेलों तेव्हां या विद्यार्थ्यांनीं थट्टामस्करी, खेळांची दंगल उडवलेली दिसली. मोठमोठ्यानें ते इंग्रजी संघगीतें म्हणत होते, मुलींची थट्टा करीत होते, एकमेकांना रबरी चेंडू मारण्याचा खेळ खेळत होते. एकाचा चेंडू डेकवरल्या खुर्चीवर बसलेल्या एका वयोवृद्ध इंग्रजाच्या बायकोच्या डोक्याला लागला, व तो संतापानें उसळून त्या विद्यार्थ्यांच्या अंगावर धांवण्याकरितां उठला. पण विद्यार्थ्यांनीं दिलगिरी व्यक्त केल्यावर तो खालीं बसला. या प्रकारानंतर थोडी दंगल कमी झाली.

एक तरतरीत चिनी विद्यार्थी माझ्याबरोबर गप्पा करीत होता. तो म्हणाला, 'तुमच्याकडल्या मेडिकल कॉलेजांचा अभ्यासक्रम मीं पाहिला. तुमच्याकडे दोन वर्षांत करावा लागणारा अभ्यास इकडे आमच्याकडून नऊ महिन्यांत

करवून घेतात हो ! ——रात्रीं दोनदोन वाजेपर्यंत वाचावें लागतें; पुन्हा सकाळीं आठ वाजतां कॉलेजचें काम सुरू होतें. ऑस्ट्रेलियांतला एक प्रख्यात प्रोफेसर आमच्याकडे शिकवायला आला आहे. तो जागतिक कीर्तीचा विद्वान् आहे; पण भारी कडक. आमच्या टिपणवह्यांत कांहीं चुकीचें दिसलें कीं सरळ त्यांचे तुकडे करून कचऱ्याच्या टोपलींत टाकून देतो ! शिकवतो मात्र फारच छान. अभ्यासाचा इतका भार पडतो कीं गेल्या वर्षीं आमच्याबरोबरच्या एका हिंदी विद्यार्थ्याचें डोकें फिरलें !

आज संध्याकाळीं समुद्राकडे पाहात डेकवर बसलों होतों. पाऊस पडून गेला होता. आकाश स्वच्छ होतें, समुद्र अगदीं शांत होता. सूर्याचा सोनेरी गोळा रुबाबांत पाण्याखालीं जात होता.

५ जून १९५५

## *तिरंगी चंद्र आणि काचेचा समुद्र*

कालच्या सोनेरी सूर्यास्ताइतकाच आजचा गुलाबी चन्द्रोदय सुंदर होता. सूर्यास्त, चन्द्रोदय ही नेहेमींचीं दृश्यें, पण शहरांतून तीं दिसतात त्यापेक्षां वरतीं आकाश आणि खालीं समुद्र अशा ठिकाणीं एक वेगळेंच जादूचें जग निर्माण होतें. मला वाटतें, आज पौर्णिमा असावी. चंद्र समुद्रांतून वर येतांना त्याच्यावर गुलाबी छटा दिसत होत्या. वर येऊन तो ठळकपणें डोळ्यांसमोर आला तेव्हां सुंदर पिवळा दिसू लागला; आणि आकाशांत खूप वर गेला तेव्हां स्वच्छ शुभ्र झाला.

६ जून १९५५

आज सकाळीं डेकवर आलों आणि समुद्राकडे पाहिलें तेव्हां भीतीची एक लहर एकदम मनाला चाटून गेली. अतिशय दंगेखोर मूल एकदम शांत होऊन स्वस्थ बसलें, आणि बोलेचालेनासें झालें तर कसें वाटेल ?——तसें कांहींसें वाटलें. समुद्राला झालें आहे तरी काय ? शांत, शांत म्हणजे किती शांत ? क्षितिजापर्यंत लहरत गेलेल्या एखाद्या स्वच्छ, तुळतुळीत कांचेच्या पाटी-सारखा समुद्र दिसत आहे. बोटीवरून उतरावें, आणि या अजस्र कांचेवरून क्षितिजापर्यंत मजेंत चालत जावें !

७ जून १९५५

## *मलाया विद्यापीठ*

सकाळीं ७ ला सिंगापूरच्या धक्क्याला बोट लागली. परततांना सिंगापुरांत आम्ही दोन दिवस राहणार हें सोनाळकरांना माहीत होतेंच. बोटीवर चहापाणी संपवून १० वाजतां सोनाळकरांच्या बॅंकेंत गेलों. उंगकू अब्दुल अझीझ यांनीं मागल्या भेटींत आपलें मलाया विद्यापीठ पाहावयाला बोलावलेंच होतें. तें सकाळीं पाहावयाला जायचें आणि रात्रीं उंगकूच्या घरीं जेवायचें असा बेत ठरला होता. सोनाळकरांच्या गाडींतून सिंगापूरच्या एका टोंकाला शांत डोंगराळ भागांत असलेल्या मलाया विद्यापीठांत गेलों.

विद्यापीठाभोंवतीं प्रशस्त बाग आहे. एक मोठी थोरली लांबच लांब पिंवळी इमारत आवारांत दिसली. उंगकू म्हणाले, जपान्यांनीं आपल्या औट घटकेच्या कारकीर्दींत ही बांधली. आपला अर्थशास्त्रविभाग दाखवितांना त्यांनीं एक बेरजा, वजाबाक्या, गुणाकार, भागाकार चुटकीसरशा करून दाखविणारें यंत्र दाखविलें. ते थट्टेनें म्हणाले, ' हें यंत्र लग्न करावें कीं नाहीं याहि तुमच्या प्रश्नाचें चटकन् उत्तर देईल असें मी माझ्या विद्यार्थ्यांना केव्हां केव्हां सांगतों ! ' कांहीं दालनांत विद्यार्थ्यांच्या परीक्षा चालल्या होत्या, आणि इंग्रज प्रोफेसर बाया देखरेख करीत होत्या. विद्यापीठाचें अद्यावत् ग्रंथालय ' एअर कंडिशन्ड ' आहे. सिंगापूरसारख्या विषुववृत्तावरल्या ऊष्ण प्रदेशांत वाचनलेखन करायला असें कांहीं तरी गारव्याचें ठिकाण हवेंच. ही व्यवस्था केल्यापासून पुष्कळ विद्यार्थी आपला बराचसा वेळ ग्रंथालयांत घालवतात, आणि साहजिकच त्यांचा अधिक अभ्यास होतो, असा उंगकूंनीं आपला अनुभव सांगितला. कांहीं दुर्मिळ ग्रंथांच्या मायक्रोफिल्म्स त्यांनीं आम्हांला दाखवल्या.

विद्यापीठाच्या मलायी भाषाविभागांत गेलों तेव्हां त्या विभागाचे वयोवृद्ध प्रमुख प्रोफेसर झैनुल अबेदिन बिन अहमद यांची त्यांनीं ओळख करून दिली. सुकार्नो टोपी आणि पांढरा सूट घातलेल्या खूप लठ्ठ, ठेंगू पण अत्यंत विनोदी आणि सुस्वभावी असलेल्या प्रोफेसर झैनुल अबेदिनांचें व्यक्तित्व आकर्षक आहे. त्यांच्याशीं गप्पा करतांना केव्हां वेळ गेला तें कळलें नाहीं. अरबस्तानचा नकाशा त्यांच्या खोलीच्या भिंतीवर होता; तो पाहून मीं म्हटलें, " हा इथं

कशाला ?" "आम्ही लोक धर्मनिष्ठ मुसलमान आहोंत," ते म्हणाले, "हा देश तर आमची पवित्र भूमि. सातव्या शतकांत तुमच्याकडल्या श्रीविजय राजाचें साम्राज्य इथें मलायांत होतें; पण पंधराव्या शतकापासून अरबांचें राज्य इथें आलें. मलाया तसा भाषादृष्ट्या फार मागासलेला आहे. मलायाचा पहिला इतिहास १९१६ सालीं लिहिला गेला. सध्यां आमच्या विद्यापीठांत मलायी आणि चिनी भाषांचे विभाग आहेत. आमच्या देशांत हिंदी म्हणजे तामीळ लोकहि दहापंधरा टक्के आहेत. बहुधा पुढल्या वर्षापासून तामीळ विभागहि उघडला जाईल. नंतर कदाचित् संस्कृतच्या अभ्यासाचीहि सोय होईल. मलायीचा संस्कृतशीं फार घनिष्ठ संबंध आहे हें तुम्हांला माहीत असेलच."

उंगकू अझीझ यांच्या पत्नी या विभागांत काम करीत असलेल्या दिसल्या. तुम्ही मलायीच्या प्रोफेसर म्हणून इथें काम करतां की काय ? मीं त्यांना विचारलें. छे हो, त्या म्हणाल्या, मी पदवीधर नाहीं ती प्रोफेसर कुठली होणार ? ––या विभागाची सेक्रेटरी-टायपिस्ट म्हणून मी काम करतें !

विद्यापीठाचे ग्रंथपाल एक इंग्रज गृहस्थ आहेत. त्यांच्या टेबलावर भारत-सरकारनें प्रसिद्ध केलेलें भारतीय नाट्यावरचें पुस्तक पडलें होतें. म्हैसूर विद्यापीठाचे प्रोफेसर नीळकंठशास्त्री मलाया विद्यापीठाला भेट देऊन गेले होते. त्यांनीं म्हैसूर आणि त्रावणकोर विद्यापीठांनीं छापलेलीं कांहीं पुस्तकें आणि तत्त्वज्ञान, वैद्यकशास्त्र, अलंकारशास्त्र वगैरेवरले कांहीं संस्कृत ग्रंथ मलाया विद्यापीठाला भेट दिले. ते ग्रंथपालांनीं मोठ्या आस्थेनें आम्हांला दाखविले. दुपारीं १२ च्या सुमारास आम्ही सोनाळकरांच्या बँकेंत परत आलों आणि नंतर त्यांच्या घरीं जेवायला गेलों. आगासकर, नंदू नाटेकर वगैरे बॅडमिन्टन सामन्यांत भाग घ्यायला सिंगापुरांत आलेल्या खेळाडूंना आज त्यांच्याकडे जेवण होतें. ताट, पाट, रांगोळ्या वगैरे इरसाल मराठी थाटांत श्रीखंडपुरी, मसालेभात वगैरेचें चमचमीत भोजन होतें ! हे खेळाडू इथून विमानानें पिनांगला खेळण्याकरितां जाणार, आणि मग पिनांगहून आमच्याच बोटीनें मुंबईला परतणार.

दुपारच्या चहानंतर साडेचार पांचच्या सुमाराला सोनाळकरांनीं आम्हांला सिंगापूरच्या एका टोंकाला असलेला 'चांगी बीच' पाहावयाला नेलें. खूप

लांबच लांब चौपाटी आहे, पण जुहूइतकी सुंदर नाहीं. माणसेंहि फारशीं नव्हतीं. खाद्यपदार्थ विकणारे आमच्या भेळपुरीवाल्यांसारखे कांहीं चिनी हातगाडीवाले दिसले. फिरायला येणारे साहेब लोक इथें हातगाडीवरले चिनी पदार्थ मोठ्या आवडीनें घेऊन खातात.

## *आसींद्राजा नलो नाम*

बोटीवर येऊन आम्हीं कपडे बदलले आणि श्री. व सौ. सोनाळकर यांच्या-बरोबर विद्यापीठाजवळ असलेल्या उंगकू अझीझ यांच्या बंगल्याकडे जेवायला जायला निघालों. तिथें पोहोंचेपर्यंत रात्रीचे पावणेनऊ वाजले. इतर पाहुणे-मंडळी बिअर, संत्र्यांचा रस वगैरे पीत आमची वाटच पाहात बसली होती. सकाळीं विद्यापीठांत भेटलेले प्रोफेसर झैनुल अबेदिन तिथें होतेच. त्यांच्या मलायी विभागांत काम करणारे तरुण डच प्रोफेसर डॉ. तेजाँग आणि सौ. तेजाँगहि आल्या होत्या. तेजाँग मंडळी लवकरच हॉलंडला परत जायची होती. मलायीचा अभ्यास करणाराला संस्कृतचें चांगलें ज्ञान असावें लागतें याचा तेजाँगशीं बोलतांना अनुभव आला. 'आसीद्राजा नलो नाम' हें संस्कृत वाक्य ते सहज बोलून गेले. सिंगापूरजवळच असलेल्या जोहोरबहारू संस्थानाच्या सचिवालयांत डेप्युटी सेक्रेटरी असलेले उंगकूचे मित्र बॅ. अब्दुल्ला आणि त्यांची पत्नीहि जेवायला होती. मसालेदार रश्श्याची कोंबडी, गुलाबी रंगाचा आकर्षक रीतीनें टेबलावर ठेवलेला मासा, अनेक रंगांच्या बहुरंगी चटण्या वगैरेचें छानदार जेवण होतें. मलायांत या कोंबडीच्या रश्श्याला 'पांगान' म्हणतात असें कळलें. आम्हीं पांगानवर चांगलाच हात मारला.

जेवणानंतर मलायी आणि जपानी गाण्यांच्या कांहीं ध्वनिमुद्रिका उंगकूंनीं वाजवून दाखविल्या. उंगकूंना जपानी भाषा चांगली येते. 'महायुद्धांत जपाननें सिंगापूर आणि मलाया घेतला तेव्हां जोहोरबहारू वगैरे संस्थानांचे मलायी सुलतान आणि जपानी अधिकारी यांना एकमेकांना समजावून सांगण्याचें दुभाष्याचें काम मीच करीत होतों,' उंगकू अझीझ म्हणाले.

नंतर इंडोनेशियांतल्या कपिराजा नृत्याची एक ध्वनिमुद्रिका त्यांनीं लावली. आपल्याकडले कथ्थकांचे बोल आणि मंत्रघोष ऐकल्यासारखें वाटलें. मारुतीची वानरसेना ओरडत असल्याचे आवाज मधूनमधून ऐकू येत होते. नंतर एक मलायी

लोकगीत लावण्यांत आलें. शब्दच नव्हे तर सूरहि ओळखीचे वाटूं लागले. उत्तरेकडून येणाऱ्या मेघांचें वर्णन गीतांत होतें. उत्तरेला मलायी शब्द 'उतार' हा आहे. मेघमंडल हा संस्कृत शब्द जसाच्या तसाच मलायींत आहे. उच्चार बंगाल्यांप्रमाणें मेघोमंडल असा करतात इतकेंच. प्रो. झैनुल अबेदिन म्हणाले, 'आमच्या मलायींत दक्षिणेला दक्सिन आणि पश्चिमेला पक्सिन हे शब्द आहेत; स्वर्ग, देव हेहि शब्द आहेत. मृत्यु, मौत याला मलायींत माती म्हणतात.' गप्पा खूप रंगल्या. रात्रीं १२ ला बोटीवर परतलों.

८ जून १९५५

## *जोहोरबहारू*

माहीमकडे ज्याप्रमाणें मधल्या खाडींत भर घालून मुंबई बेट मुख्य भू-भागाला एका रस्त्यानें जोडलें आहे तसेंच सिंगापूर-मलायाच्या मुख्य प्रदेशांतल्या जोहोरबहारूला एका 'कॉजवे'नें जोडलें आहे. आज सकाळीं जोहोरबहारूला जाऊन थोडासा मलायाचा मुख्य प्रदेश पाहावयाचें ठरवलें होतें. सोनाळकरांचा धिप्पाड भय्यासारखा दिसणारा शोफर सज्जनसिंग हा 'आपण शीख आहोंत' म्हणतो. पण दाढी किंवा जटा नसल्यामुळें,—नुसती भरदार मिशीच असल्यामुळें दिसतो काशीप्रयागकडल्या अगडबंब भय्याप्रमाणें. मोठा उमदा माणूस आहे. सुभाषबाबूंच्या आझाद हिंद फौजेंत होता. सिंगापूरची आणि मलायाची त्याला चांगलीच माहिती आहे. युद्ध संपल्यानंतर तो सिंगापुरांतच राहिला. त्याला मलायी, तामीळ, हिंदी या सर्व भाषा येतात. 'युद्धाच्या वेळीं मलायाच्या जंगलांतून आम्ही खूप फिरलों आहोंत, तुम्हांला हवं तें दाखवतों,' तो म्हणाला. जोहोरबहारूंत दोन-अडीच तास भटकून दुपारीं एक-दीडला सोनाळकरांकडे जेवायला यायचें होतें. तेव्हां तो हवें तें दाखवायला तयार असला तरी आम्हांला हवें तितकें पाहावयाला वेळ कुठें होता !

बोटीवर स्नान, प्रातरुपाहार वगैरे आटोपून सोनाळकरांच्या गाडींतून सकाळीं साडेनऊच्या सुमाराला आम्ही बाहेर पडलों. थोड्याच वेळांत कॉजवे-कडे येऊन पोहोंचलों. सिंगापूर आणि मलाया या दोन्ही प्रदेशांवर ब्रिटिशांचेंच राज्य असलें तरी या दोन्ही वेगळ्या वसाहती असल्यामुळें मुंबई बेटांतून माहीम कॉजवे ओलांडून वांद्र्याकडे जातांना ज्याप्रमाणें वाटेंत दारूबंदीच्या पोलिसांचें

ठाणें आहे तसेंच इथें कॉजवे संपतो तिथें कस्टमचें नाकें आहे. नाकें पार करून पुढें गेलों तों एक भव्य, व्यवस्थित ठेवलेली मशीद दिसली. सिंगापुरांतल्या-पेक्षां इथें एकदम वेगळें वाटलें तें म्हणजे पाहावें तिथें सिंगापुरांतल्यासारखे पिवळे चिनी दिसत नव्हते, तर लुंगीसारखा रंगीबेरंगी सेरॉंग आणि सदऱ्यामध्यें फिरणारे काळे सांवळे मलायी दिसत होते. एका चौकापलीकडे एक मोठी थोरली जुनाट पिवळी इमारत दिसली. तो जोहोरबहारू संस्थानाच्या सुलतानाचा राजवाडा असल्याचें कळलें. तांबडया विटांची एक भव्य इमारत हॉस्पिटलची होती. कांहीं चहापाण्याची दुकानें भारतीय तामिळांचीं दिसलीं; आणि भेंडी-बाजारांतल्या मुसलमानांच्या दुकानांत चहापाणी घेणारे बाहेर फूटपाथवर खुर्च्या टाकून चहापाव वगैरे घेतात तसेंच कांहीं इथें दिसलें. तेव्हां भारतांत-ल्याच एखाद्या गांवांत आपण फिरत आहोंत असें वाटलें.

जोहोरबहारूच्या खाडीच्या कांठानें फिरत असतां मलायी कोळयांच्या झोंपडया आणि त्यांचीं जाळीं दिसलीं. सभोंवार खुट पुरून त्यांना लावलेलीं जाळीं मध्यें झोळीसारखीं लोंबत होतीं. जवळच एक लहानसें खोपट होतें. या जाळयांनीं मासे कसे पकडतात याची कांहीं कल्पना येईना.

## *रबराच्या मळ्यांत*

नंतर रबराच्या उंच झाडांची गर्द राई होती तिथें गेलों. जगांतला बहुतेक रबर मलायांतच होतो. 'या मळयांत काम करणारे बहुतेक स्त्रीपुरुष आपल्या भारतांतले तमीळ आहेत', सज्जनसिंग म्हणाला. कांहीं रबराच्या झाडांमधून एक काळीकुट्ट तमीळ म्हातारी हातांत एक बादली घेऊन येत असलेली आम्हांला दिसली. स्वच्छ पांढऱ्या दुधानें बादली भरली आहे, असें वाटलें. तो रबराचा चीक होता. प्रत्येक झाडाची गोल साल काढून एक पत्र्याचा तुकडा खोंचलेला असतो. त्याच्या टोंकाला एक बुटकुलें तारेनें बांधून ठेवलेलें असतें. दिवसभर त्या बुटकुल्यांत रबराचा चीक ठिबकतो. बुटकुलें भरलें कीं बादलींत ओता-वयाचें. हें काम करीत ती मद्रासी म्हातारी फिरत होती. सज्जनसिंग तिच्याशीं तामिळीमध्यें बोलत होता. 'बादलीचें वजन करून त्याप्रमाणें आपणांला मजुरी देतात,' ती म्हातारी त्याला म्हणाली. 'यंदां पाऊस कमी आहे तेव्हां रबरहि कमी मिळणार,' ती सांगत होती. तिच्या बादलींत बोट बुडवून मीं पाहिलें.

अगदीं दुधांत बोट घातल्यासारखें वाटलें. रबराचा चीक फारसा जाड नव्हता. मात्र झाडावर सुकलेला चीक ओढून पाहिला तेव्हां चांगली लांब तार येऊं लागली.

## *मेंत्री बेसार*

जोहोरबहारूंतल्या सचिवालयाची प्रशस्त इमारत मोंगल पद्धतीनें बांधलेली वाटली. दिवाण-इ-आम, दिवाण-इ-खाससारखे मोठमोठे दिवाणखाने, आणि एके ठिकाणीं तर तख्तहि दिसलें. काल रात्रीं उंगकू अझीझ यांच्या घरीं जेवणाच्या वेळीं भेटलेले चुणचुणीत मलायी गृहस्थ, बॅरिस्टर अब्दुल्ला सचिवालयांत अंडरसेक्रेटरी असल्याचें कळलेंच होतें. त्यांच्या खोलीवर गेलों तेव्हां ते सिगारेट ओढीत काम पाहात असलेले दिसले. ‘ सिंगापूर हें बेट आहे, जोहोरबहारू म्हणजे मलाया,’ ते म्हणाले, ‘बरं झालं तुम्ही पाहायला आलांत तें’. त्यांनीं कॉफी मागवली आणि कांहीं वेळानें आमच्याबरोबर फिरून सचिवालय दाखवलें. जोहोरबहारू, केलान्तान वगैरे आठ नऊ संस्थानें मिळून मलाया होतो. ब्रिटिशांचें मलायावर अधिराज्य असलें तरी या प्रत्येक संस्थानचा सुलतान आहेच. जोहोरबहारूचे सुलतान सध्यां युरोपांत आहेत. सचिवालयांतल्या एका मोठ्याखोलीच्या दारावर ‘मेंत्री बेसार ’ अशी इंग्रजी पाटी होती. हें काय म्हणून अब्दुल्लांना आम्हीं विचारलें तेव्हां त्या शब्दाचा अर्थ ‘ मुख्य मंत्री’ असा असल्याचें त्यांनीं सांगितलें. सचिवालयाच्या गच्चीवरून शहराचें चांगलें दृश्य दिसतें, म्हणून लिफ्टमधून त्यांनीं आम्हांला वर नेलें. लिफ्ट चालवणारा नोकर अली हा मद्रासकडला भारतीय मुसलमान होता. आम्हांला पाहून तो खूष झाला.

पांढरा सूट आणि काळी मलायी टोपी घातलेलें छोटेंसें, सुटसुटीत बॅ.अब्दुल्ला आपण चाळीस वर्षांचे आहोंत असें म्हणाले, तेव्हां आम्हांला खरेंच वाटेना. मलायी लोकांचें वय त्यांच्या चेहेऱ्यावरून किंवा अंगलटीवरून सांगणें फार कठिण आहे. ते फार तरुण दिसतात. अब्दुल्ला फार उमद्या स्वभावाचे आणि थट्टेखोर आहेत. माणूस जितका रसिक तितकाच विद्वान् असल्याचें तास दीडतासाच्या सहवासांतच आमच्या लक्षांत आलें. सचिवालयांतलें ग्रंथसंग्रहालय दाखवतांना बाली बेटांत अनेक वर्षें राहिलेल्या एका मेक्सिकन चित्रकारानें बाली बेटांवर लिहिलेलें पुस्तक त्यांनीं आमच्या हातीं हातीं दिलें, आणि

एकदोन मिनिटांत त्या पुस्तकाची मार्मिक चर्चा केली. आपल्याकडे ज्याप्रमाणें मोल्सवर्थ, कॅन्डी इत्यादि ब्रिटिश सनदी नोकरांनीं मराठी भाषेचे कोश तयार केले, त्याप्रमाणेंच मलायांतले एक ब्रिटिश अधिकारी आर. एस्. विल्किन्सन यांनीं तयार केलेला मलायी-इंग्रजी शब्दकोश त्यांनीं आम्हांला दाखवला.

## *बॅ. अब्दुल्लांचें घर*

'आतां आमच्या घरीं चला,' ते म्हणाले,

'तुम्ही आत्तांच ऑफिसांत आलां असाल', मी म्हणालों, 'नि पुन्हा–'

'ऑफिस आहेच' ते उद्‌गारले, 'तुम्ही मंडळी मलायांत काय पुन्हा येणार ? आमच्या घरीं आलेंच पाहिजे तुम्ही. तास अर्ध्या तासांत ऑफिसांत परत येईन मी.'

सचिवालयाच्या आवारांतली आपली मोटर त्यांनी बाहेर काढली नि त्यांच्या मागून आमची मोटर घ्यायला त्यांनीं सज्जनसिंगाला सांगितलें.

'आमचें आपलें जुनें घर आहे,' असें अब्दुल्ला म्हणाले होते, पण त्यांचा बंगला, त्यांतलें फर्निचर, बाहेरचीं फुलझाडें, आंतल्या फुलदाण्या, खिडक्यांचे पडदे त्यांच्या रसिकतेची चांगलीच साक्ष देत होते. त्यांचीं व्यवस्थितपणें लावलेलीं पुस्तकांची कपाटें पाहतांना त्यांच्याबद्दल मला वाटत असलेला आदर क्षणोक्षणीं वाढत होता. एका कपाटांत टी. एस्. इलियटचीं नाटकें, त्याच्या टीकालेखांचीं पुस्तकें, टॉल्स्टॉय, टॉमस मॅन, जेम्स जॉइस यांच्या कादंबऱ्या, अरबांचा इतिहास, नेहरूंच्या भाषणांचा ग्रंथ, पट्टाभिसीतारामय्यांनीं लिहिलेला काँग्रेसचा इतिहास मला दिसला. एक दोन पुस्तकें बाहेर काढून मीं सहज चाळून पाहिलीं. त्यांत सुंदर, सुवाच्य अक्षरांत टिपणें केलेलीं मीं पाहिलीं. तीं पुस्तकें केवळ शोभेकरितां ठेवलेलीं खास नव्हतीं. 'लंडनमध्यें मी शिकत होतों इतक्यांत युद्ध सुरू झालं' अब्दुल्ला म्हणाले, 'तेव्हां रॉयल एअर फोर्सच्या वैमानिकांसाठीं मलायी भाषेवर व्याख्यानं देण्याचं काम मला मिळालं. त्याआधीं पैसे संपल्यामुळें कित्येक महिने नुसतं पाव-लोणी नि पाणी यांच्यावर राहण्याची माझ्यावर पाळी आली होती हो ! हें काम मिळालं नि चंगळ झाली. वर्षाला एक हजार पौंड पगार ते मला देत होते. मग काय, पुस्तकं विकत घेत होतों, नाटकं पाहात होतों, जलशांना

जात होतों–(बायकोकडे डोळे मिचकावून पाहात)–इंग्लिश पोरींना घेऊन भटकत होतों !'

अब्दुल्लांची तरुण पत्नी झहीदा तिथं होतीच. ती खिलाडूपणें हंसत म्हणाली, 'बरं, बरं–परत जा इंग्लंडला ! '

## मळायीं फराळ

ते मलायाला परत आले तेव्हां जपानचा पराभव करून ब्रिटिश मलायांत परत आले होते. एक हजार जपानी कैद्यांच्या एका कॅम्पच्या मुख्य अधिकाऱ्याचें काम त्यांनीं अब्दुल्लांना दिलें होतें. कैदेंतल्या कांहीं जपानी लष्करी अधिकाऱ्यांची त्यांच्याशीं चांगली मैत्री झाली होती. एकानें त्यांना आपली 'सामुराई' तलवार बक्षीस दिली होती, तर दुसऱ्यानें 'हाराकिरी' करायचा खंजीर दिला होता. या वस्तु एका कांचेच्या कपाटांत व्यवस्थितपणें मांडून ठेवलेल्या होत्या.

आम्ही दिवाणखान्यांत बोलत बसलों होतों, इतक्यांत झहीदाबाईनीं तांबड्या सरबताचीं ग्लासें, आणि एका सुदर बशींतून द्राक्षें, केळीं वगैरे फळें आमच्या पुढ्यांत आणून ठेवलीं. मलायी केळ्यांचें एक वैशिष्टच म्हणजे बाहेरून सालीचा जसा त्यांचा पिवळा रंग होता तसाच पिवळा आंतल्या गाभ्याचाहि होता.

## सुभाषबाबू आणि क्लिंग

सात वर्षांच्या, पांच वर्षांच्या, तीन वर्षाच्या अशा तिथें खेळत असलेल्या आपल्या छोट्या मुलांची अब्दुल्लांनीं आमच्याशीं ओळख करून दिली. सर्व-सामान्यपणें मलायी लोक फारसे उजळ असल्याचें आम्हांला आढळलें नव्हतें. पण अब्दुल्लांच्या पत्नी झहीदाबेगम आणि सुदर फ्रॉकमधल्या त्यांच्या नीटस चेहेऱ्याच्या मुली चांगल्याच उजळ होत्या. एका मुलीचें नांव आझा. दुसरीचें सुकैना. मीं म्हटलें, 'अहो, हिचं नांव आशा नि हिचं सुकन्या असेल !'

'म्हणजे काय ?' अब्दुल्लांनीं विचारलें.

त्या संस्कृत शब्दांचा अर्थ मीं त्यांना सांगितला.

ते हंसत म्हणाले, ' असेल, बुवा ! (आपल्या बायकोकडे पाहात) हिचे

आजोबा तुमच्या भारतांतून—मलबारमधून इथं आले म्हणे. या सुकन्येला तर आम्ही क्लिग म्हणतों.'

'म्हणजे ?' मी उद्गारलों.

'आमच्या मलायांत ब्रिटिश राजवटींत हिंदी माणसाला तिरस्कारदर्शक अर्थानें क्लिग म्हणत. युद्धकाळांत जपान्यांनीं ब्रिटिशांना हांकलले नि सुभाषबाबूंनीं सिंगापुरांत आझाद हिंद राज्य पुकारलें, तेव्हां त्यांनीं या क्लिग शब्दावर बंदी घातली. आतां ब्रिटिश परत आलेले असले तरी आम्ही हा शब्द वापरीत नाहीं. पण ही सुकन्या चांगली उजळ आहे; आणि विशेष म्हणजे तिचे डोळे आम्हां मलायीसारखे बारीक नाहींत—तुम्हां हिंदी लोकांसारखे चांगले मोठे आहेत—म्हणून थट्टेनें आम्ही तिला केव्हां केव्हां क्लिग म्हणतों!'

बारा सव्वाबाराच्या सुमाराला आम्ही परत फिरलों. अब्दुल्ला वाटेंत सचिवालयांत गेले. कॉजवेकडे येत असतां जोहोरबहारूतल्या एका दुकानावर 'भारत स्टोअर्स' अशी इंग्रजी पाटी दिसली. एका चहाच्या दुकानावर 'केरल रेस्टोरां' अशी पाटी होती, आणि आंत मल्याळी नोकर दिसत होते.

९ जून १९५५

## *चिन्यांच्या बौद्ध मठांत*

आज दुपारीं १२-३० वाजतां बोट सिंगापूर सोडणार. उद्यां दुपारीं पुन्हा पिनांग.

१० जून १९५५

दुपारीं १ ला पिनांगच्या धक्क्याला बोट लागली. आम्ही जवण करून बाहेर पडायला तयारच होतों. सकाळपासून पाऊस होता. पिनांगला आलों तेव्हांहि पाऊस चालूच होता. पिनांगमधल्या युनायटेड कमर्शियल बॅंकेचे मॅनेजर आणि सोनाळकरांचे मित्र श्री. अय्यर हे आपली मोटर घेऊन बोटीवर आम्हांला भेटायला आलेच होते. त्यांनीं आम्हांला आपल्या घरीं नेलें. सौ. अय्यर इंग्रजी आणि हिंदुस्थानी चांगलें बोलत होत्या, इतकेंच नव्हे तर 'मला मराठीहि चांगलें समजतें,' त्या म्हणाल्या! पूर्वीं त्या माटुंग्यांत कित्येक दिवस राहिलेल्या होत्या. त्यांनीं दिलेले गरम गरम 'मेद्दु वड्डाई' आणि

चहा घेऊन आम्ही फिरायला बाहेर पडलों. आधीं पिनांगमधले आमचे जुने मित्र श्री. ठाकोरलाल यांना भेटायला त्यांच्या चुलिया स्ट्रीटमधल्या घरीं गेलों. त्या दिवशीं रात्रीं बॅडमिन्टनचे सामने खेळायला पिनांगमध्यें आलेल्या आमच्या नंदू नाटेकर, डोंगरे, हेमाडी वगैरे खेळाडूंना पिनांगच्या इंडियन ॲसोसिएशनतर्फे 'उभें जेवण' (ब्यूफे-डिनर) होतें. त्याला येण्याचें आग्रहाचें आमंत्रण ठाकोरलालांनीं ॲसोसिएशनचे उपाध्यक्ष या नात्यानें आम्हांला दिलें. ठाकोरलालांशीं गप्पागोष्टी करून पिनांगमधलें एक फार जुनें बौद्ध मंदिर आणि मठ पाहावयाला आम्ही बाहेर पडलों.

तिबेट किंवा चीनच्या बाहेर चिनी भिक्षूंचा असा हा एकमेव मठ आहे म्हणतात. पिनांगमधल्या टेकडीवर हा मठ आहे; आणि मुंबईमधल्या बाबुलनाथाच्या मंदिराकडे जातांना ज्याप्रमाणें पुष्कळशा पायऱ्या चढून वर जावें लागतें तसेंच इथेंहि जावें लागतें. झिम् झिम् पाऊस पडत होता, आणि टेकडीच्या टोकाशीं ढग घोटाळत होते. बाबुलनाथच्या पायऱ्या चढून जातांना दोन्ही बाजूंला जसे भिकारी बसलेले दिसतात तसेच इथेंहि होते; पण हे चिनी भिकारी आरडाओरड करून जाणाऱ्यायेणाऱ्यांचा पिच्छा पुरवीत नव्हते. नुसता हात पुढें करीत होते. पायऱ्या चढून वर जातांना दोन्ही बाजूंना छोटीं छोटीं खोपटवजा दुकानें दिसलीं. मात्र हीं दुकानें आमच्या देवळाजवळच्या अबीर-बुक्क्यांच्या किंवा फुलांच्या दुकानांसारखीं नव्हतीं; ससे, कोंबडया वगैरेंचीं होतीं !

एक खप्पड चेहेऱ्याचा गरीबसा चिनी, 'मी तुम्हांला सर्व मठ दाखवतों, तुम्हांला काय हवें तें मला द्या' असें म्हणत आमच्या मागें मागें येत होता. त्याला आम्ही बरोबर घेतलें. माणूस फार चांगला होता, आणि इंग्रजीहि बरें बोलत होता. अर्ध्या पायऱ्या चढून गेल्यावर एका बाजूला एक लहानशी पुष्करिणी दिसली. तिच्यांत मध्यभागीं एका मोठ्या थोरल्या दगडाचें कांसव होतें. त्याच्या पाठीवर पाण्यांतलीं जिवंत कांसवें चढून बसलीं होतीं आणि कुणीं हिरवीं पानें आंत टाकलीं तर झुंड करून तिकडे जात होतीं आणि तीं पानें मटकावून टाकीत होतीं. दुसऱ्या एका लहानशा पुष्करिणींत बरेच मासे होते. ते लोकांनीं टाकलेलीं बिस्किटें खात होते ! टेकडीच्या टोंकाशीं उंचावर कानटोपीच्या वर उचलेल्या कानांसारखीं दिसणारीं मठाचीं चिनी छपरें

दिसत होतीं. हवा सर्द, ढगाळ, पावसाळी होती. त्यांत त्या जुनाट मठाच्या दमट, कळकट भिंती अधिकच जुनाट आणि कळकट वाटत होत्या. अशाच एका कळकट खोलींत भेंडीबाजारांतल्या कळकट चहाच्या दुकानांत असतात तशीं मळकट टेबलें आणि प्रत्येक टेबलाभोंवतीं तीनचार जुनाट बेंटवुडच्या लांकडी खुर्च्या दिसल्या. हें काय मठांतलें चहाचें दुकान आहे कीं काय, म्हणून आम्हीं आमच्या चिनी वाटाड्याला विचारलें. 'छे, छे', तो म्हणाला, 'अहो, ही भिक्षूंची जेवणाची खोली आहे!' या खोलीवरून इथले चिनी भिक्षू कसे असतील याची कल्पना आम्हीं केलीच होती. ती लवकरच खरी ठरली. पलीकडे एका खोलीच्या दाराशीं मळकट पायजमे आणि कांखेंत उसवलेले गंजिफ्रॉक घातलेले चारपांच मोडकळीला आलेले म्हातारे, अर्धे म्हातारे चिनी कांचेच्या पेल्यांतले कांहीं तरी हातांतल्या काड्यांनीं पटापट खात असलेले दिसले. आम्हांला वाटलें, हे कुणीतरी मठांतले नोकर असतील. भिक्षू निदान भगव्या वस्त्रांत तरी असतील. 'हे कोण' म्हणून वाटाड्याला विचारलें, तेव्हां तो म्हणाला, 'हेच या मठांतले भिक्षू! असे तीस भिक्षू या मठांत आहेत म्हणे.'

## बौद्ध स्वर्ग आणि नरक

मठाच्या एका सोप्यांत एक मोठा थोरला लांकडी मासा सांखळ्यांनीं टांगलेला दिसला. त्याच्यावर काठ्या मारून ढोलासारखा आवाज काढतात. भिक्षूंची जेवणाची वेळ झाली कीं हा वाजवतात. एका दालनांत छोट्या छोट्या चौकोनी गाद्या इतस्ततः पडलेल्या दिसल्या. या गाद्यांवर गुडघे टेकून भिक्षू प्रार्थना करतात. एका भव्य दालनांत चकचकीत ब्रॉन्झ धातूची बुद्धाची एक प्रचंड मूर्ति होती. बाजूला चिनी बौद्धांचा स्वर्ग दाखवला होता. त्यांत झाडांच्या हिरव्या फांद्यांवर छोटे छोटे चिनी देव पांखरांसारखे बसले होते. लहान लहान नऊ मूर्ति एके ठिकाणीं होत्या. 'या आमच्या नऊ कन्यका,' आमचा चिनी वाटाड्या म्हणाला. आमच्या सप्त मातृकांची मला आठवण झाली. एकीकडे बौद्ध नरक दाखवला होता. हातांत लांबरुंद खड्ग घेतलेले यमदूतां-सारखे तीन मिशाळ देव या यमपुरीचे प्रमुख होते. मध्यें चिनी बौद्धांची हंसऱ्या चेहऱ्याची लंबोदर बुद्धमूर्ति होती. तिच्या दोन्ही बाजूंना खोटें बोलणारे,

चोरी करणारे, दारू पिणारे, इत्यादि पाप्यांना धिप्पाड यमदूत शिक्षा करीत असलेले दिसत होते.

सिंगापूरचे टायगर बामवाले धनाढ्य आह् बून पार यांनीं मोठी थोरली बुद्धमूर्ति असलेला पिवळ्या रंगाचा एक सात मजली पॅगोडा इथं बांधला आहे. सयाम देशानें दिलेली बुद्धाची एक सुरेख सुवर्णमूर्ति एके ठिकाणीं कांचेच्या पेटींत ठेवली आहे. जपान्यांनीं पिनांग घेतलें तेव्हां त्यांनीं या मठाला दिलेली शुभ्र संगमरवरी दगडाची एक 'करुणादेवी' (गॉडेस ऑफ मर्सी) एके ठिकाणीं दिसली !

## *पिनांगमधले हिंदी बांधव*

संध्याकाळीं साडेसहाला बोटीवर परत आलों. कपडे बदलून पिनांगच्या क्लब हाऊसमध्यें इंडिया ॲसोसिएशनच्या जेवणाला साडेसातला जायचें होतें. अय्यरांनीं दिलेल्या मोटारींतूनच पिनांगमध्यें फिरत होतों. कपडे बदलून सात वाजतां त्यांच्या घरीं गेलों. त्यांच्याकडे कुआलालंपूरच्या रबर प्रयोग-शाळेंतले एक शास्त्रज्ञ श्री. चंद्रशेखर हे मद्रासी गृहस्थ आले होते. त्यांच्या भावाचा जांवई डॉ. कृष्णन् पिनांगमधल्या जनरल हॉस्पिटलांत डॉक्टर आहे. डॉ. कृष्णन् आणि त्यांची पत्नीहि अय्यरांकडे ॲसोसिएशनमध्यें जायला आलेली होती. सौ. कृष्णन् या पिनांगमधल्या इंडियन ॲसोसिएशनच्या महिला शाखेच्या अध्यक्ष आहेत. हीं दोघेंहि पतिपत्नी मद्रासी असूनहि चांगलींच गौरवर्ण आणि देखणीं आहेत. सर्व मिळून साडेसातला क्लबहाऊसमध्यें गेलों. क्लबच्या दाराशींच ॲसोसिएशनचे शीख अध्यक्ष श्री. बलवंतसिंग यांनीं आमचें स्वागत केलें. अद्यावत् इंग्रजी कपड्यांतले बरेचसे शीख इथें आम्हांला भेटले. मथुरे-कडल्या भय्यानें केलेलें मूगडाळ, भात, पुरी, शिरा, सामोसे, मटार-बटाट्याची भाजी वगैरे उत्कृष्ट पदार्थांचें शाकाहारी जेवण होतें. कोंबडी वगैरेचें मांसाहारी जेवणहि थाटाचें होतें. ज्याला हवें तें त्यानें घ्यावें. संत्र्यांचा रस किंवा व्हिस्की यांचीं ग्लासेंहि रिकामीं राहूं देण्यांत येत नव्हतीं.

पिनांग हॉस्पिटलमध्यें काम करणारे, छोटेसे दिसणारे डॉ. राव मला इथें भेटले. मोठे बोलके आणि सुस्वभावी. ते इंग्रजींत म्हणाले, 'अहो, मी महाराष्ट्रीयच आहें. पण मराठी मात्र येत नाहीं ! माझे वडील प्रो. संजीवराव

मद्रासच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांत इंग्लिशचे प्रोफेसर होते. ते मूळचे पुण्यांतले. माझी आई तंजावरकडली. मला वाटतं, आमचं मूळ नांव पुणतांबेकर. मद्रासहून वडील ओरिसांत पुरीला गेले. मला इकडे चांगले चौदाशें मलायी डॉलर्स म्हणजे जवळ जवळ दोन हजार रुपये पगार मिळतो. पण माझ्या मनांतून पुण्याला घर बांधून तिथं राहृचचंय ! पुण्याची हवा छान आहे कीं नाहीं ? '

## चिनी मालती !

मला हळूंच कोपरानें खुणवून पुण्याच्या हवेची स्तुति करायला त्यांनीं कानांत सांगितलें. सुंदर रेशमी साडी नेसलेली त्यांची चिनी बायको त्यांच्या-बरोबर होती. तिचें नांव त्यांनीं मालती ठेवलें आहे. हिंदुस्थानांत जाऊन स्थायिक व्हायचें तर बंगलोरला घर बांधून राहावें, असा तिचा आग्रह होता. बंगलोर फार चांगलें शहर आहे असें कुणीं तरी तिच्या डोक्यांत भरवून दिलेलें होतें. डॉक्टरांच्या मनांतून पुण्याला घर बांधायचें होतें. म्हणून ते मालतीजवळ पुण्याची जोरानें शिफारस करायला मला खुणावीत होते !

बॅडमिन्टनचें जागतिक अजिक्यपद मिळवणाऱ्या देशाला 'टॉमस् कप्' देण्यांत येतो. तो ज्यांच्या नांवाचा आहे ते सत्तरीच्या जवळ आलेले सर जॉर्ज टॉमस आजच्या जेवणाला हजर होते. मलायाच्या बॅडमिन्टन ॲसोसिएशनचे अध्यक्ष हिया जूक सियांग यांचें जेवणानंतर भाषण झालें. आमच्या बॅडमिन्टन संघाचे मॅनेजर श्री. आगासकर यांनींहि उत्तराचें भाषण चांगलें केलें. पिनांगचें प्रतीक कोरलेले चांदीचे चमचे आमच्या नन्दू नाटेकर, डोंगरे वगैरे भारतीय खेळाडूना स्मृतिचिन्हें म्हणून देण्यांत आले.

पिनांगमधले आमचे मित्र श्री. ठाकोरलाल, श्री. अय्यर, डॉ. कृष्णन्, सौ. कृष्णन् वगैरेंचा निरोप घेऊन बोटीवर रात्रीं १० वाजतां परत आलों. याच बोटीनें आमचे बॅडमिन्टन खेळाडू घरीं परत येत आहेत. ते साडेदहा वाजतां बोटीवर आले. रात्रीं दोन वाजतां बोटीनें पिनांग सोडलें.

११-१२ जून १९५५.

## मुफ्तींची मजा

आकाश स्वच्छ व निळें आहे, आणि स्वच्छ सूर्यप्रकाश पडला आहे. पण

बोट मात्र फार हालत आहे. आडवी डुलत नाहीं, तर उभी वर खालीं होत आहे. आमचे सर्व खेळाडू आणि बरेचसे उतारू बोट लागून बेजार झाले आहेत. खोल्या सोडून डेकवर कुणी येत नाहीं.

१३ जून १९५५

स्वच्छ ऊन पडलें आहे, पण समुद्र अजूनहि खवळलेलाच आहे. पो ही नांवाचा एक वयस्क चिनी गृहस्थ आणि त्याची बायको माझ्या शेजारींच डेकवरल्या आरामखुर्च्यांवर बसलीं आहेत. अद्यावत् इंग्रजी पोशाखांतल्या या चिनी जोडप्याला बोलायला खूप पाहिजे. इंग्लंडमध्यें त्यांचीं तीन मुलें शिकत आहेत. त्यांना भेटायला तीं सिंगापुराहून इंग्लंडला जात आहेत. मुलगी एफ्. आर. सी. एस्. चा अभ्यास करीत आहे. एक मुलगा सिव्हिल इंजिनियर होतो आहे. दुसरा नुकताच इंग्लंडमध्यें दाखल झाला आहे. अर्धवट गंभीर, अर्धवट हंसरा चेहेरा करून खोंचदार बोलण्यांत पो ही तरबेज आहेत. 'आमच्या जोहोरच्या सुलतानांची एक बहीण नुकतीच वारली' ते म्हणाले, 'तिनं दहा हजार मलायी डॉलर आपला आत्मा मक्केला नेण्याकरितां जोहोरच्या मुफ्तीच्या नांवानं ठेवले आहेत!'

'म्हणजे?', मी उद्गारलों. 'म्हणजे काय,' पो ही सांगू लागले, 'मुफ्ती निघालाय आतां तिचा आत्मा घेऊन मक्केला जायला. तुम्ही हिंदू लोक मृतांना जाळतां तेव्हां तुम्ही मृताची राख काशीला घेऊन जातां, तें ठीक आहे, हो; पण आत्मा मक्केला नेण्याचं हें प्रकरण काय असेल वरं?—दहा हजार डॉलर घेऊन मजा करतोय लेकाचा तो मुफ्ती!'

१४ जून १९५५

## *कोलंबोंत हत्तींचीं आंघोळ*

सकाळीं ११ च्या सुमारास कोलंबो बंदर दिसूं लागलें. लाटांचा मारा थोपवून बंदरांतलें पाणी संथ ठेवण्याकरितां कोलंबो बंदराच्या बाहेर एक भलीभक्कम तटबंदी भिंत बांधली आहे. खवळलेल्या समुद्राच्या अजस्र लाटा तिच्यावर तावातावानें तुटून पडत होत्या, आणि फेंसाळत मागें परतत होत्या. लाट फुटली कीं मध्येंच तटबंदीचे काळेभुरके दगड दिसत, आणि

पुन्हा पाण्यांत लपत. डेकवर माझ्या शेजारीं दोन युरोपियन मुलें उभीं होतीं. 'पाहा, पाहा, हत्ती आंघोळ करीत आहेत !,' तीं उद्‌गारलीं.

दुपारचें जेवण बोटीवर करून दोनच्या सुमारास लाँचमधून कोलंबोंत गेलों. एक मोटर ठरवून संध्याकाळपर्यंत कोलंबोंत भटकायचें ठरवलें. पांढऱ्या कोट-पॅन्टमधला, आमचा काळाकुळकुळीत सिंहली टॅक्सीवाला एक वल्ली निघाला. तो उत्तम इंग्रजी बोलत होता. इतिहास, भूगोल, चालू राजकीय परिस्थिति,—कोणत्याहि विषयावर अस्खलितपणें चर्चा करायची त्याची तयारी होती. 'मी मूळचा उत्तर हिंदुस्थानांतला,' तो म्हणाला, 'आमचे पूर्वज दोन हजार चारशें नव्याण्णव वर्षांपूर्वी तिथून सिलोनमध्यें आले !'

## *रणबाहू, सिंहबाहू*

कोलंबोंत फिरतांना दक्षिण भारतांतल्या एखाद्या शहरांत आपण फिरत आहोंत असा भास होतो. तसेच काळे कुळकुळीत स्त्रीपुरुष. सुशिक्षित, वरच्या वर्गातल्या स्त्रिया साड्या वापरतात; पण सामान्य स्त्रिया कमरेला लुंगी-सारखें पांढरें फडकें गुडाळलेलें आणि वर पांढरेंच पोलकें अशा कपड्यांत मलबारी किंवा मल्याळी बायकांसारख्या त्या वाटतात. विशेषत: पेट्टाभागांत फिरतांना तर आपण भारतांतच फिरत आहोंत असें वाटतें. जुनाट खटारे झालेल्या हिरव्या रंगाच्या ट्रामगाड्या इकडून तिकडे जात असलेल्या दिसतात. नळबाजारासारखाच जुनाट पत्र्यांचा भाजी आणि मासे यांचा बाजार. तशींच दुकानें. दुकानांत केळ्यांचे लोंगर , बिनसोललेले नारळ. फार काय श्रीमहा-लक्ष्मी स्टोअर्स अशा नांवाची एखादी पाटी. मधूनमधून लालवानी, मोहनदास इत्यादि सिंधी नांवांचीं दुकानें, रस्त्यांत एखादा भगव्या वस्त्रांतला, मुंडन केलेल्या डोक्याचा भिक्षु दिसतो आणि आपण सिलोनमध्यें आहोंत याची आठवण होते. एका रस्त्याला नांव तर भारतीय अॅव्हेन्यू असें दिसलें ! एके ठिकाणीं 'दहीवल' पोलीस स्टेशन दिसलें. 'दहीवल, कोतलवल' अशीं शहराच्या विभागांचीं नांवें आहेत. आमचा टॅक्सीवाला म्हणाला, 'दहीवल म्हणजे लिंबाची वाडी.' रस्त्यांचीं नांवें 'कोल्लूपिटिया, बंबलापिटिया ! आनंद, मीनाक्षी अशीं माणसांचीं नांवें कांहीं ठिकाणीं आढळलीं. एका

घरावर रणबाहू या नांवाची पाटी वाचली. बंदरांतल्या लाँचचें नांव होतें 'सिंहबाहू' !

## रत्नपुरांतले अवशेष

कोलंबोंतलें व्हिक्टोरिया म्यूझियम हें वस्तुसंग्रहालय पाहण्यासारखें आहे. संग्रहालयाच्या भव्य पांढऱ्या इमारतीभोंवतीं प्रशस्त बागबगीचा आहे. सिंहलद्वीपांतल्या रत्नपूर भागांत अडीच लक्ष वर्षांपूर्वीचे इतिहासपूर्व काळांतले कांहीं अवशेष सिलोनच्या पुराणवस्तुसंशोधन खात्याला उत्खनन करतांना सांपडले. ते एका दालनांत मांडून ठेवले आहेत. त्या काळांतले हत्ती, गेंडे वगैरे प्राणी आजच्या त्या जातीच्या प्राण्यांहूनहि प्रचंड आकाराचे होते. त्यांचे शिलीभूत अवशेष इथें आहेत. सांबरासारख्या, पण खूपच मोठ्या 'जायंट् एल्क' नांवाच्या प्राण्याची कवटी शिंगासह इथें आहे. त्या शिंगांनीं दालनाची एक सबंध बाजू अडवली गेली आहे. हा अवशेष दहा हजार वर्षांपूर्वींचा आहे म्हणे. आपल्या इथल्या अजंठाच्या रंगीत चित्रांसारखींच सिलोन-मधलीं सिगिरिया येथील भित्तिचित्रें प्रसिद्ध आहेत. तिथले कांहीं नमुने इथें दिसले. कॅंडीच्या राजघराण्यांतला शेवटचा राजा विक्रमराजसिंघ आणि त्याची सुंदर राणी यांचीं चित्रें एके ठिकाणीं आहेत. राणी फार सुंदर वाटली, पण राजाचा चेहेरामोहरा आणि टोपी, पोशाख नादिरशहाच्यासारखा पाहून कसेंसेंच वाटलें ! राजपक्ष मुदलिवार नांवाच्या कुणा ऐतिहासिक पुरुषाच्या रत्नजडित मुठीच्या तलवारी एके ठिकाणीं मांडून ठेवल्या होत्या.

## मंदिरपण नसलेलें मंदिर

संग्रहालयांतून आम्ही अशोकारामय हें कोलंबोंतलें प्रसिद्ध बुद्धमंदिर पाहावयाला गेलों. बुद्धगयेचीं प्राचीन बुद्धमंदिरें मीं पाहिलीं आहेत. कोलंबोंतलें हें अलीकडचें बुद्धाचें मंदिर पाहून मला धक्काच बसला. बाहेरून तें गचाळ आवारांत उभें असलेल्या उपनगरांतल्या एखाद्या मळकट पांढऱ्या घरासारखें वाटतें. त्यांत 'मंदिरपण' कुठेंच दिसत नाहीं. आंत शिरल्यावर आजूबाजूंच्या भिंतींवर रंगवलेल्या जातककथांचे भडक हिरवे, पिवळे, लाल, जांभळे रंग आणि त्यांतले स्त्रीपुरुष किंवा पशुपक्षी पाहून आपल्याकडे मारवाड्यांच्या

घरांच्या भिंती चितारणाऱ्यांना फारच श्रेष्ठ कलावंत म्हणावेसें वाटलें. आंतल्या गाभाऱ्यांतल्या बुद्धाची मूर्ति व इतर मूर्ति इमारतीच्या मानानें खूपच मोठ्या आहेत, पण त्यांच्यांतहि शिल्पकलेचा कुठें मागमूसहि नाहीं. बुद्धमूर्तीसमोर 'फ्लीट' किंवा 'पॉयशा' च्या नळकांड्यासारख्या दिसणाऱ्या 'व्हिम्' पावडरच्या—तसें लेबल असलेल्या पिवळ्या डबड्यांत मळकट कागदी फुलें ठेवलेलीं पाहून मला मळमळून आलें. तिथें उभ्या असलेल्या एका काषाय-वस्त्रधारी भिक्खूला, 'हीं इथें कुणीं ठेवलीं' म्हणून मी विचारलें. 'कुणातरी मुलीनें आणून ठेवलीं आहेत,' तो भिक्खू शांतपणें उत्तरला!

## *हत्तींची चहापार्टी*

कोलंबोंतल्या प्राणिसंग्रहालयाच्या बागेंत दररोज संध्याकाळीं सव्वापांच वाजतां 'हत्तीची चहापार्टी' नांवाचा एक कार्यक्रम असतो. गांवांतल्या मुलांची आणि परदेशी पाहुण्यांची या वेळीं 'झू' मध्यें नेहमीं गर्दी असते. हत्तींना बाहेर काढतात आणि त्यांचा राखणदार सर्कशींतल्यासारखे अनेक प्रयोग त्यांना लोकांसमोर करायला लावतो. हत्ती त्या माणसाला सोंडेनें उचलून पाठीवर ठेवतो, त्याला स्वतःच्या जबड्यांत धरून ठेवतो, शेवटीं चहासारखें कांहीतरी पेय पिऊनहि दाखवतो! आम्ही पांच वाजतां 'झू' च्या बागेंत गेलों तेव्हां बरोबर पांचाच्या ठोक्याला एक घंटा वाजत होती. कुणीतरी म्हणालें, 'वाघसिंहांची जेवायची वेळ झाली.' खरोखरच त्या वेळेला बकऱ्यांच्या मांसाचे मोठमोठे तुकडे नोकरलोक वाघसिंहांसमोर नेऊन टाकीत होते. या झूमध्यें लावलेल्या पाट्या मजेदार आहेत. एके ठिकाणीं म्हटलें आहे, 'इथें जंगलांतल्या जनावरांना बंदुकीच्या गोळ्यांची भीति काडीमात्र मनांत न आणतां मनुष्यप्राण्यांचा चांगलाच अभ्यास करतां येतो!' दुसरीकडे सुसरीच्या हाडांचा सांपळा ठेवला आहे. 'तुम्हीं दगड मारून हिला ठार केलें!' अशी पाटी तिथें आहे. मुलें प्राण्यांना दगड मारतात, त्यांना दिलेली ही सूचना आहे.

गॉलफेसच्या समुद्रकिनाऱ्यावरून भटकत आम्ही बोटीकडे परत येत होतों. थोड्याच वेळापूर्वीं अस्ताला जाणाऱ्या सूर्याच्या सोनेरी उन्हांनीं न्हाऊन निघालेल्या [illegible] जवळच्या माडांच्या गर्द हिरव्या राया आतां झपाट्यानें

संध्याछायांत गुरफटून काळवंडून जात होत्या. त्या छायांतून दूर कुठें कुठें दिवे लुकलुकूं लागले. एका माडाच्या झावळ्यांतून 'कुहू कुहू' असा कोकिळेचा स्वर कानांवर आला, आणि आपण भारतांतच आहों असें वाटलें. आज रात्रीं बोट कोलंबो सोडणार आणि मग दोन दिवसांनीं खरोखरच घरीं — भारतांत.